


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








**संपादक :** प्र० ना० परांजपे

**संपादन-समिती :** प्र० ना० परांजपे (प्रमुख), विजय पाध्ये, आनन्द काटीकर, सरोजा भाटे, सलील वाघ, विजया चौधरी.

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय आणि संपादकीय पत्रव्यवहार, लेख व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :**
आनन्द काटीकर, बी-5/16, सनसिटी, सिंहगड मार्ग, आनंदनगर, पुणे 411051.
चलभाष : 094216 10704 ई-पत्ता : anand.katikar@gmail.com

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.org या संकेतस्थळाचे
व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 095459 50808 **विजय पाध्ये** - 098220 31963.
marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी** -

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | ₹ १५०/- | ₹ ४००/- | ₹ ७००/- |
| **संस्था :** | ₹ २००/- | ₹ ५५०/- | ₹ ९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/-+ नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **(आयएफएस संकेत क्र० MAHB 0000041) बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान ₹ २,५००/-, अर्धे पान ₹ १,५००/-, पाव पान ₹ ८००/- शुभेच्छा ₹ ४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹ ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य ₹ ४०/-**



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका


| | | |
|---|---|---|
| आदरांजली : राजकीय व्यंग्यचित्रकलेचे शिखर : आर०के० लक्ष्मण | ०२ | शि०द० फडणीस |
| संपादकीय : विलास सारंग १९४२-२०१५ | ०३ | प्र०ना० परांजपे |
| कायद्याची भाषा | ०५ | अनुराधा मोहनी |
| मराठीची नामानुसारी व्यवस्था | १८ | नीती बडवे |
| मराठीच्या अभिजाततेतील 'महाभारत' आणि कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर | २५ | मिहिर कृष्ण अर्जुनवाडकर |
| परिभाषा-परीक्षणाची आवश्यकता | २९ | केतकी मोडक |
| शब्दकोश प्रकल्प : इयत्ता नववी | ४० | जयश्री काटीकर |
| 'टपोरी' बोलीतील 'फ्यूजन' वाक्प्रचार | ४५ | नेहा किशोर सावंत |
| महाजालावरील मराठी : अरविंद गुप्तांची वैज्ञानिक खेळणी | ५० | सुशान्त शं० देवळेकर |
| अंकलेखन : मराठी, इंग्रजी व चिनी | ५२ | नीलकंठ बापट |
| दखलयोग्य : मराठी भाषा धोरण : काही शंका; काही प्रश्न! | ५५ | प्रा० अभय दातार |
| पुस्तक-परीक्षण : महाबँक पुरस्कारप्राप्त-ग्रंथ : संकल्पनाकोश | ५७ | विद्यागौरी टिळक |
| भाषा-वार्ता : (१) भाषांचे भवितव्य आणि शिक्षणाची सर्वसमावेशकता | ६१ | रेणुका ओझरकर |
| (२) भाषाविकास-संशोधन-संस्था, कोल्हापूर | ६७ | नंदकुमार मोरे |
| (३) प्राथमिक शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच असावे का? | ६८ | विवेक सबनीस |
| परिषद्-वार्ता : मराठी भाषेच्या उन्नतीच्या दिशा | ७१ | आनन्द काटीकर |
| प्रतिसाद : (१) लिपीचे 'सोपेकरण' | ७२ | पुष्पा फडके |
| (२) म्हणी, वाक्प्रचार आणि संप्रदाय | ७३ | प्रा० कल्याण साठे |
| भाषा आणि जीवन : लेखनसूची २०१४ | ७४ | प्र०ना० परांजपे |
| मुद्रणदोष-दुरुस्ती | २८ | |
| पानपूरके | २३,५४,५६,७६ | |
| लेखक-परिचय | ८०+मलपृष्ठ ३ | |


मुखपृष्ठ-चित्र : अनिकेत जऱ्हाड, रचना : सलील वाघ

आदरांजली

# राजकीय-व्यंग्यचित्रकलेचे शिखर : आर० के० लक्ष्मण

– शि०द० फडणीस

वास्तविक पाहता, मी व्यंग्यचित्रकलेच्या प्रांतात इतकी वर्षे असलो तरी माझा आणि आर० के० लक्ष्मण यांचा परिचय १९९०मध्ये सोलापूर येथे झालेल्या व्यंग्यचित्र-प्रदर्शनाच्या वेळेस झाला. त्या प्रदर्शनाचे उद्‌घाटक म्हणून आर० के० लक्ष्मण आले होते. त्यानंतर ते पुण्यातच स्थायिक झाल्यामुळे परिचय वाढत गेला. २०११मध्ये त्यांचा नव्वदावा वाढदिवस माझ्या हस्ते केक कापून साजरा झाला असला, तरी आमची मैत्री वगैरे होऊ शकली नाही. कारण ते थोडे अंतर्मुख स्वभावाचे होते. स्वत:च्या कोशात राहणे त्यांना आवडे. त्यामुळे त्यांना जवळचे मित्र वगैरे नव्हते; पण त्यांच्या बाबतीत एक गोष्ट मात्र खरी, की ते खरे कलाकार होते. हाडाचे व्यंग्यचित्रकार होते. त्यांचा कुंचला जेवढा प्रभावी होता, तितकीच त्यांची लेखणीही परिणामकारक होती. उत्तम चित्र आणि चपखल शब्दयोजना सर्वांनाच जमत नाही. या दोन्ही कला तितक्याच तोलामोलाने लक्ष्मण यांच्याकडे नांदत होत्या.

शंकर हे जुन्या पिढीतील व्यंग्यचित्रकार. 'हिंदुस्थान टाइम्स' या दैनिकात राजकीय व्यंग्यचित्रे काढत असत, ती लोकप्रियही होती. त्या अर्थाने भारतीय वृत्तपत्रीय क्षेत्रात राजकीय व्यंग्यचित्रकलेचे जनक म्हणून शंकर यांच्याकडेच पाहिले जाते. अबू एब्राहम यांची व्यंग्यचित्रेही प्रभावी होती; पण लक्ष्मण यांच्याप्रमाणे चित्र आणि शब्द या दोन्ही अस्त्रांवर त्यांची हुकूमत नव्हती. त्यामुळेच लक्ष्मण यांचे नाव झाले. व्यंग्यचित्रकलेच्या प्रांतात राजकीय व्यंग्यचित्रे या नव्या शाखेला उत्तम दिशा देण्याचे काम लक्ष्मण यांनी केले. लक्ष्मण यांच्यापूर्वी अशी व्यंग्यचित्रे अधूनमधून येत असत, ती कोणत्याही पानावर येत आणि ती मोठी म्हणजे २-३-४ स्तंभी असत. लक्ष्मण यांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी 'पॉकेट कार्टून' (एक स्तंभी आणि ६ सेंमी) आकाराची राजकीय व्यंग्यचित्रे काढण्यास प्रारंभ केला. ती दररोज येऊ लागली आणि मुख्य म्हणजे नेहमीच पहिल्या पानावर त्यांच्या व्यंग्यचित्रांना स्थान मिळाले. त्यांच्या या लोकप्रियतेमुळे भारतातील सर्वच वृत्तपत्रांत पहिल्या पानावर व्यंग्यचित्रकार विराजमान झाले. 'यू सेड इट' या नावाने येणारी ही व्यंग्यचित्रे अतिशय मार्मिक असत. समकालीन घटनांवर ती लगेचच भाष्य करत. 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये 'काय म्हणालात?' किंवा 'काय म्हणता?' अशा भाषांतरित स्वरूपात ती येत असल्यामुळे महाराष्ट्रातील सर्वच वाचकवर्गाला लक्ष्मण हे नाव आणि व्यंग्यचित्रे परिचित झाली; आणि

[ पान क्र० २४ वर पाहा...

# विलास सारंग १९४२-२०१५

– प्र० ना० परांजपे

मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांत ललित लेखन करणारे व आंतरराष्ट्रीय मान्यता मिळवणारे एका हाताच्या बोटांवर मोजण्याइतके जे मराठी लेखक आहेत. त्यांतील एक प्रमुख लेखक विलास सारंग अलीकडे कालवश झाले. कथा, कादंबरी, कविता आणि समीक्षा असे सर्व लेखनप्रकार त्यांनी हाताळले आणि त्यांत लक्षणीय यश मिळवले. गाडगीळ-गोखले यांच्या नवकथेपेक्षा भिन्न अशी नवकथा त्यांनी लिहिली. काफ्का, काम्यू, बेकेट व मार्खेज यांच्या लेखनाचा त्यांच्यावर प्रभाव होता. सामाजिक आवरण सोलून काढल्यावर त्याखाली आढळणारा एकाकी, गोंधळलेला माणूस त्यांच्या लेखनाच्या केंद्रस्थानी आहे. त्यामुळे त्यांच्या लेखनाचे वर्णन अतिवास्तववादी किंवा अद्भुत वास्तववादी असे केले जाते.

त्यांनी जवळजवळ २५ पुस्तके लिहिली. त्यांत सतरा मराठी, सात इंग्रजी व एका फ्रेंच पुस्तकाचा समावेश आहे. 'लंडन मॅगेझीन'मध्ये कथा प्रसिद्ध होणारे ते कदाचित एकमेव मराठी लेखक असावेत. त्यांचा 'आतंक' हा कथासंग्रह प्रथम फ्रेंचमध्ये, नंतर इंग्रजीत व शेवटी मराठीत प्रसिद्ध झाला!

मराठी-अभ्यास-परिषदेने आपल्या २०१२च्या महाबँक भाषाविषयक लेखन-पुरस्कारासाठी सारंगांच्या 'भाषांतर आणि भाषा' या पुस्तकाची निवड केली. पुरस्कार स्वीकारण्यासाठी त्यांना येता येणे शक्य नव्हते. म्हणून परिषदेचा अध्यक्ष यां नात्याने मी कांदिवलीच्या त्यांच्या घरी जाऊन तो त्यांना दिला. अर्धांगवायूच्या दोन आघातांमुळे विकलांग होऊन अंथरूण व चाकांची खुर्ची यांत ते बंदिस्त झाले होते. त्यांची बरीच मराठी पुस्तके त्यांनी त्या अवस्थेत लिहिली. नाशिकच्या जनस्थान-पुरस्कारासाठीही त्यांची निवड करण्यात आली होती. तो स्वीकारण्यासाठी नाशिकला जाता येणे त्यांना शक्य नसल्यामुळे तो एका 'लोकप्रिय' लेखकाला देण्यात आला.

सारंगांनी मुंबई विद्यापीठाच्या एम०ए० व पीएच०डी० (इंग्रजी भाषा व साहित्य) या पदव्या मिळवल्या. अमेरिकेतील इंडियाना विद्यापीठाचीही पीएच०डी०(तौलनिक भाषाभ्यास) मिळवली. मुंबईतील एस०आय०इ०एस० महाविद्यालय व मुंबई विद्यापीठ येथे त्यांनी अध्यापन केले. नंतर इराक, कुवेत, बसरा येथील विद्यापीठांत अध्यापन केले.

सारंग खऱ्या अर्थाने आधुनिक जाणिवेचे लेखक होते. त्यांच्या 'लेखकीय' अंतर्मनाने





अनुक्रमणिका

कुटुंब, समाज, देश यांची बंधने झुगारली आणि मानवी अस्तित्वाच्या भागधेयाचे वेध घेतले. त्यामुळे असे म्हणता येईल की त्यांचा वैश्विकतावाद नेमाड्यांच्या देशीवादाच्या विरोधी टोकावर उभा होता. त्यांच्यामध्ये दोन ध्रुवांइतके अंतर होते. अरुण कोलटकर, दिलीप चित्रे व आपण असे फक्त तिघेच खऱ्या अर्थाने आधुनिक मराठी कवी आहोत असे ते एकदा म्हणाले होते. पण आश्चर्य असे की कोलटकरांनी 'जेजुरी', चित्र्यांनी 'शक्तीची प्रार्थना' व 'पुन्हा तुकाराम' आणि सारंगांनी 'अमर्याद आहे बुद्ध' व 'रुद्र' यांचे लेखन केले. त्यामुळे कदाचित असे म्हणता येईल हे तिघे वैश्विकतेकडून देशीयतेकडे आणि नेमाडे देशीयतेकडून वैश्विकतेकडे गेले आहेत.

सारंगांच्या 'गर्भवती' या कथेने मराठीत खळबळ निर्माण केली होती. तिच्यावर अश्लीलतेबद्दल खटलाही होऊ घातला होता. हेमिंग्वेच्या 'दि ओल्ड मॅन अँड द सी' या कादंबरीच्या पु०ल० देशपांडे यांनी केलेल्या 'एका कोळियाने' या भाषांतराचे सारंगांनी केलेले परखड परीक्षण 'सत्यकथे'च्या वाचकांना विसरता येणार नाही.

सारंग 'सामान्य' वाचकाचे लेखक नव्हते. त्यांचे लेखन समजत (व 'पचत') नाही. अशी अनेक वाचकांची तक्रार असे. पण वाचकानेही काही प्रयत्न केला पाहिजे हे मात्र आपण विसरतो. सारंगांसारखे लेखक वारंवार निर्माण होत नाहीत. जेव्हा होतात तेव्हा त्यांच्या समकालीनांना त्यांचे मोठेपण कळत नाही. म्हणून सारंगांची त्यांच्या जिवंतपणी व मृत्यूनंतरही पुरेशी दखल घेतली गेली नाही. पण मराठी भाषेच्या व साहित्याच्या विकासात त्यांनी किती मोलाची भर घातली आहे हे आज ना उद्या मराठी वाचकाला निश्चितपणे उमजेल असा मला विश्वास आहे.

## विलास सारंग यांची ग्रंथसंपदा

**कथासंग्रह :** सोलेदाद, चिरंतनाचा गंध, आतंक, फेअर ट्री ऑफ द व्हॉइड (इंग्रजी) ल तेररिस्त ए ओत्तरेसी (फ्रेंच).

**कवितासंग्रह :** कविता १९६९-१९८४ : घडत्या इतिहासाची वाळू, अ काइंड ऑफ सायलेन्स (इंग्रजी), इंडियन पोएट्री सिन्स १९५० (अँथॉलजि) (इंग्रजी).

**कादंबऱ्या :** एन्कीच्या राज्यात, इन द लँड ऑफ एन्की (इंग्रजी), रुद्र, तंदूरच्या ठिणग्या, अमर्याद आहे बुद्ध, डायनॉसॉरशिप (इंग्रजी), द विमेन इन केजीस (इंग्रजी).

**समीक्षा :** सिसिफस आणि बेलाक्वा, अक्षरांचा श्रम केला, सर्जनशोध आणि लिहिता लेखक, मॅनहोलममधला माणूस, स्टायलिस्टिक्स ऑफ लिटररी ट्रान्सलेशन : ए स्टडी विथ रेफरन्स टु इंग्लिश अँड मराठी (इंग्रजी), लिहित्या लेखकाचे वाचन, भाषांतर आणि भाषा, अरुण कोलटकरांची बिलोरी कविता.

■






# कायद्याची भाषा

–अनुराधा मोहनी

[ लेखिकेने २७ फेब्रुवारी २०१५ या मराठी भाषादिनी 'मराठी-अभ्यास-परिषदे'साठी (कालवश) सत्त्वशीला सामंत स्मृतिव्याख्यान दिले. त्या व्याख्यानाची ही संहिता.]

कायदा म्हणजे एखाद्या राज्यातील अधिकाराने सर्वश्रेष्ठ असा नियम. त्याचे कायद्याच्या परिभाषेतील नाव एॅक्ट किंवा अधिनियम असे आहे. भाषेचा विचार करण्यासाठी आधी आपल्याला तो काय प्रकार आहे हे समजून घ्यावे लागेल. म्हणून ह्या ऍक्टचा गोतावळा कसा असतो ते पाहू. त्याच्याखाली नियम, विनियम, उपविधी, आदेश, ऑर्डिनन्स, शासन-निर्णय, परिपत्रक हे सगळे प्रकार येतात. तेही राज्यसंस्थेनेच तयार केलेले व जनतेवर बंधनकारक असतात; परंतु त्यांचा अधिकार तेवढा असत नाही. जसे नियम (रूल्ज) हे एखाद्या अधिनियमाच्या तरतुदी अमलात आणण्याच्या उद्देशाने त्याच्याखाली तयार केलेले असतात. विनियम (रेग्युलेशन्स) हेदेखील एखाद्या विशिष्ट अधिनियमाखालीच तयार केले जातात. पण नियमांप्रमाणे त्यांना विधानमंडळाच्या मंजुरीची आवश्यकता नसते. उपविधी (बायलॉज) हे नियम तयार करण्यास प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांनी विशिष्ट प्रवर्गातील किंवा विशिष्ट प्रदेशातील लोकांसाठी तयार केलेले नियम होत. आदेश (ऑर्डर्ज) हे न्यायालयाने हुकूमनामा काढावा तशा पद्धतीने परंतु शासकीय अधिकाऱ्यांकडून काढले जातात. ऑर्डिनन्सेस हे नगरपालिका किंवा विद्यापीठ अशा संस्थांचे व्यवस्थापन करण्यासाठी त्या त्या संस्थांच्या प्राधिकाऱ्यांनी काढलेले असतात. शासन निर्णय (गव्हर्मेंट रेझोल्युशन्स् जी.आर.) हे मंत्रिमंडळाने घेतलेले निर्णय शासनाच्या विविध विभागांमधील अधिकारी-कर्मचाऱ्यांना कळवण्यासाठी काढले जातात. तर हे असे सर्व प्रकार जे आहेत, त्यांच्या अधिकाराची व्याप्ती अनेक अर्थांनी मर्यादित असते. अधिनियमाचे मात्र तसे नाही. अधिकाराने सर्वोच्च असे राज्यसंस्थेचे जे पीठ आहे— म्हणजे राज्यात विधान-मंडळ व केंद्रात संसद— त्यांच्याकडूनच तो तयार केला जातो. संमत झाला, की त्याला अर्थ व वजन प्राप्त होते व तो यथास्थिती राज्यात वा देशात– सर्वांना बंधनकारक असतो. अधिनियम हा एकाच विषयाच्या संबंधातील संहिताबद्ध म्हणजे लिखित स्वरूपाचा नियम असतो. आपल्या देशातील सर्व नागरिकांचे वर्तन हे कुणा एकाच्या किंवा काहींच्या मर्जीवरून न ठरता ते ह्या संहिताबद्ध अशा नियमांच्या साहाय्याने नियंत्रित केले जाईल असे जेव्हा ठरले तेव्हापासून म्हणजे २६ जानेवारी १९५०पासून अधिनियम

हे सर्वश्रेष्ठ नियम मानले गेले आहेत. त्याआधीचेही ब्रिटिशांनी केलेले अधिनियम अद्यापि लागू आहेत; पण तो भाग वेगळा. तर हे झाले अधिनियमांसंबंधी. कायदा हा अधिक व्यापक व खरेतर समूहवाचक शब्द आहे. त्यामध्ये एखाद्या विषयाशी संबंधित एक किंवा अनेक अधिनियम, नियम, निर्णय-विधी (केसलॉ) म्हणजे न्यायालयाने त्यावर दिलेले निवाडे इत्यादींचा समावेश होतो. त्यामुळे भाषेबद्दल जागरूक असे जे लोक आहेत, त्यांनी अधिनियमाला कायदा म्हणू नये. कायदा म्हटला, की तो क्लिष्ट आणि बोजडच असणार असा सामान्यत: लोकांचा समज असतो आणि त्यामुळे सहसा त्याच्या वाटेला कुणी जात नाहीत. हे कायद्याच्या सर्व घटकांच्या बाबतीत खरे आहे. अधिनियमाबद्दल बोलायचे तर तो समाजाला लागू होणारा नियम असल्यामुळे आणि तो पाल्हाळ न लावता सूत्ररूपाने मांडायचा असल्यामुळे त्यातील वाक्ये काहीशी गुंतागुंतीची होणे अपरिहार्य ठरते. हेच नियम व निर्णय-विधी ह्यांच्याबद्दलही म्हणता येईल. परंतु त्याचा बाऊ करण्याचे कारण नाही. कायद्याच्या शब्दबंधांची रचना कशी असते ते एकदा समजल्यावर हे सर्व मुळातून वाचणे कठीण वाटायला नको. एखादी लिपी अवगत झाल्यावर आपल्याला ती भाषा वाचता यावी, अंक व गणिती चिन्हे समजल्यावर गणिते वाचता वा सोडवता यावीत, किंवा संगणकाची भाषा माहिती झाल्यावर संगणकाच्या आज्ञावली लिहिता व वाचता याव्यात, तसेच कायद्याचे आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी, की वेगवेगळ्या भाषा किंवा लिप्या, गणित किंवा संगणक ह्या सर्वांचा जेवढा प्रसार झाला, आणि हे सर्व जेवढ्या मोठ्या प्रमाणावर शिकवले किंवा शिकले जाते, तेवढा प्रसार कायद्याचा झाला नाही. कायदा वाचायचा कसा अशा पद्धतीने शिकवलाच जात नाही. कायद्याच्या विषयावर आज अफाट ग्रंथसाहित्य उपलब्ध आहे. आज कोणत्याही वकिलाकडे जावे तर त्याच्या कक्षातील जाड जाड ग्रंथ पाहून छाती दडपून जाते. ह्या ग्रंथांमध्ये कोणत्या शब्दाचा कोणत्या न्यायालयाने कसा अर्थ लावला व त्यानुसार कोणत्या प्रकरणात काय निवाडा दिला ह्याबद्दलच्या माहितीची रेलचेल असते. परंतु मूळ अधिनियम कसा वाचावा ह्याचे मार्गदर्शन मात्र मिळत नाही. त्यामुळे कायद्यासारखे महत्त्वाचे क्षेत्र आज सर्वसामान्यांपासून दूर जाऊन न्यायालये व वकिलांचे कक्ष ह्यांच्यामध्ये बंदिस्त झाले आहे. एरवी तर सोडाच; पण न्यायालयात दाद मागायला जाणारा माणूसही संबंधित कायद्याचे परिशीलन स्वत: करत नाही. ते वकिलावर सोपवून तो मोकळा होतो.

कायदा – इंग्रजी की मराठी? भारताची न्यायव्यवस्था ही इंग्रजांच्या न्यायव्यवस्थेकडून घेतलेली आणि तीवर आधारलेली अशी आहे. आज आपल्या न्यायव्यवस्थेतील पायाभूत मानले गेलेले, त्यांनी रचलेले अधिनियम (साक्षीपुरावा अधिनियम, कारखाना अधिनियम, भारतीय दिवाणी व फौजदारी संहिता, संविदा अधिनियम इ०) हे इंग्रजीतच लिहिले गेले. आजही आपले राज्य व केन्द्रीय अधिनियम त्याच भाषेत व शैलीत लिहून आपण

वसाहतवादाची ओळख जपत आहोत. हे कायदे मागाहून हिन्दी वा अन्य भारतीय भाषांमध्ये अनुवादित केले जातात. न्यायविषयक साहित्याचा गाभा व अधिकांश भाग असलेले इतर सर्व दस्तऐवज — न्यायालयात दाखल करावयाच्या विनंतीअर्जापासून तर न्यायनिर्णय व निर्णयविधीपर्यंत —ह्यांचे मसुदे आणि लेखन इंग्रजीतूनच केले जाते. आज आपली न्यायिक चिंतनाची भाषा इंग्रजीच आहे. दुसरीकडे आपण कायदा माहीत नसणे ही कायद्याचे पालन न करण्याची सबब होऊ शकत नाही, हेही तत्त्व म्हणून स्वीकारले आहे. सामान्य माणसाला त्याच्या भाषेत राज्य करता आले पाहिजे, प्रशासनाचे नियम त्याच्या भाषेत समजले पाहिजेत, न्यायालयात जाऊन त्याच्या भाषेत दाद मागता आली पाहिजे म्हणून आपण — महाराष्ट्रापुरते बोलायचे तर — राजभाषा मराठीचा स्वीकार केला आहे. अशा इंग्रजी-मराठी दोहोंच्या कैचीत आपण सापडलो आहोत. त्यातून सुटका करण्याचा मार्ग सध्या कोणता आहे, तर अधिनियमाचा मसुदा इंग्रजीत तयार करायचा, त्याचा मराठी व हिंदीमध्ये अनुवाद करायचा व विधेयक मांडतानाच ते तिन्ही भाषांमध्ये मांडायचे, नंतर त्यांचा अधिनियमही तिन्ही भाषांमध्ये तयार होतो आणि राज्यपालांची सही होऊन शासकीय राजपत्रात प्रकाशित झाल्यावर तो मूळ इंग्रजी अधिनियमाचा निव्वळ अनुवाद नव्हे तर प्राधिकृत पाठ म्हणून मानला जातो. म्हणजे, त्याला मूळ अधिनियमाचा दर्जा दिलेला आहे. केंद्रीय अधिनियमांच्या बाबतीतही अशीच प्रक्रिया चालते. विधेयक म्हणून मांडतानाच ते हिंदी व इंग्रजीतून मांडले जाते व त्यावर राष्ट्रपतींची स्वाक्षरी होऊन शासकीय राजपत्रात प्रकाशित झाल्यानंतर दोन्ही भाषांमध्ये अधिनियम तयार होतात. निवडक केंद्रीय अधिनियमांचा सर्व राज्यांच्या राजभाषांमध्ये अनुवाद करण्यात येतो. उदा० दिवाणी व फौजदारी प्रक्रिया-संहिता, माहितीचा अधिकार-अधिनियम, शिक्षण-अधिकार-अधिनियम, घरगुती-हिंसाचार-अधिनियम हे सर्व मराठीतही आहेत. त्यांनाही प्राधिकृत पाठ म्हणजे मूळ अधिनियमाचा दर्जा दिलेला आहे.

मराठीतील अधिनियमांना प्राधिकृत पाठाचा दर्जा दिल्यामुळे त्यांच्या अनुवादाची जबाबदारीदेखील अनिवार्यपणे सरकारकडे — राष्ट्राच्या कार्यकारी अंगाकडे-येते. त्याची यथायोग्य अर्थउकल करून व नेमकी परिभाषा वापरून अनुवाद होणे आवश्यक असते. त्याचप्रमाणे विधेयकाच्या रूपात असताना तो बाहेर जाहीर होऊ द्यायचा नसतो, त्यामुळे अनुवादाचे काम सरकारचेच काम असावयास हवे, व तसेच ते आहे.

दि० १ मे १९६०ला महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली. त्यानंतर मराठी ही राज्याची राजभाषा असेल असे जाहीर झाले व शासनव्यवहारात, न्यायव्यवहारात व उच्च शिक्षणात तिचा वापर व्हावा ह्यासाठी ६ जुलै १९६० रोजी भाषा-संचालनालयाची स्थापना झाली. राज्य अधिनियमांचा हिंदी व मराठीत आणि केंद्रीय अधिनियमांचा मराठीत अनुवाद करण्याचे काम ह्याच भाषा-संचालनालयात केले जाते. न्याय-व्यवहारापुरते बोलायचे तर

दोन प्रकारची अत्यंत मूलभूत कामे संचालनालयाने केली आहेत. पहिले म्हणजे अनुवाद. विधी विषयाशी संबंधित अनुवाद करण्यासाठी पाच कार्यासने तेथे आहेत. (१) केंद्रीय अधिनियम (२) राज्य-अधिनियम (३) अधिसूचना म्हणजे अधिनियमाखाली तयार करण्यात आलेले नियम (४) अधिनियमांचे अद्ययावतीकरण म्हणजे सुधारणा - अधिनियमान्वये मूळ अधिनियम सुधारित करणे आणि (५) न्यायनिर्णय ह्यांमध्ये मुंबई उच्च न्यायालयाने दिलेले महत्त्वाचे न्यायनिर्णय अनुवादित करणे.

दुसरे मूलभूत काम म्हणजे त्यासाठीची परिभाषा तयार करणे. ती कशी तयार करण्यात आली, तर प्रथम कायद्याचा अनुवाद करण्यात आला. त्यामध्ये अनुवादाच्या ओघात ज्या काही पारिभाषिक शब्दांचा अनुवाद होऊन गेला, त्यांची मागाहून सूची करण्यात आली. शब्दकोशाच्या कामाला अशा रीतीने प्रारंभ झाला. न्यायव्यवहार-कोशाचा पहिला प्रयत्न सत्तरच्या दशकात झाला असावा. त्यामध्ये श्री० ना० स० श्रीखंडे ह्यांच्या अध्यक्षतेखाली श्री० त्र्यं० कृ० टोपे, श्री० ल० वि० देशपांडे इत्यादींची समिती गठित करण्यात आली होती. भाषा-संचालनालयाचे आद्य संचालक श्री० वा० ना० पंडित राजभाषा-विधायी आयोगाचे सदस्य असताना व वा० म० कुलकर्णी हे भाषा-संचालक असताना हा कोश काढण्यात आला. त्यामध्ये सामंतबाईंनी अतिशय मौलिक व महत्त्वाची भूमिका बजावली होती. हा कोश सायक्लोस्टाइल रूपातच द्विखंडात्मक असा होता व संचालनालयाच्या सर्व कार्यालयांमध्ये इतकी वर्षे तोच अत्यंत जिव्हाळ्याने वापरला जात होता. त्यानंतर ते दोन खंड एकत्र करून १९९८ साली मुद्रित स्वरूपातील पहिला न्यायव्यवहार कोश प्रकाशित झाला. आताचा न्यायकोश हा २००८ साली म्हणजे त्यानंतर दहा वर्षांनी काढण्यात आला. न्या० चंद्रशेखर धर्माधिकारी ह्यांच्या अध्यक्षतेखाली १९९३ साली जी विधी-अनुवाद व परिभाषा-सल्लागार-समिती गठित करण्यात आली तिने हा कोश तयार केला. ह्या समितीने नंतरच्या काळात झालेल्या कायद्याच्या अनुवादातील अनेक नवीन पर्यायी शब्द वेचून घेतले आणि मूळ इंग्रजी शब्द व त्यांचे पर्याय अशा दोन्ही बाजूंना भर घालून हा कोश सिद्ध केला. ह्या नवीन कोशामुळे त्या भाषेचा प्रसार करण्यासाठी एक चांगले उपकरण आपल्या हाती आले आहे.

न्यायव्यवहार कोश कसा तयार करण्यात आला? तर प्रथम इंग्रजी शब्द व त्यांचे मराठी पर्याय ह्यांची सूची करण्यात आली. वेगवेगळ्या संदर्भात एकाच शब्दाचे वेगवेगळे अर्थ होतात हे लक्षात आले तेव्हा एकाच इंग्रजी शब्दापुढे अनेक मराठी पर्यायांची नोंद करण्यात आली. एकाच प्रकारच्या अर्थाचे, भिन्न अर्थच्छटा असलेले शब्द असतात, त्यांना तशाच प्रकारचे, ज्यामधून त्यांचे जैविक नाते कळेल व त्यांच्यामधील बारीक फरकही स्पष्ट होईल असे पर्याय दिले जातात. असे शब्द, कोशात त्या त्या जागी तर दिलेले असतातच, परंतु त्याशिवाय एका ठिकाणीही ते सर्व एकत्रपणे दिलेले असतात. त्यांना

शब्दाचे कूळ असे म्हणतात. ह्या कोशाचे दुसरे वैशिष्ट्य असे, की एकाच छत्राखाली येणारे पोटप्रकारदेखील एकत्र दिलेले आहेत. त्यांना संज्ञाप्रकार असे म्हटले आहे. असे एका कुळातील वेगवेगळे शब्द तयार करण्यासाठी संस्कृत भाषेचा फार उपयोग होतो.

( १ ) एकच धातू वापरून, त्याला भिन्न उपसर्ग लावून रूपे सिद्ध करता येतात. वा प्रत्यय

( २ ) समास ही संस्कृतची फार मोठी देणगी आहे. त्यामुळे सामासिक शब्दांच्या रूपात ते सहजतेने तयार करता येतात.

( ३ ) अशा रीतीने तयार झालेले शब्द मराठीसोबतच हिंदी व इतर भारतीय भाषा ह्यांच्यामध्ये एकरूपता ठेवण्यासाठी खूप उपयोगी पडतात. आपल्याला त्या सर्वांचाही विचार करावाच लागणार आहे; कारण देशातील सर्व भाषाभगिनींची एकत्रितपणे जेवढी ताकद वाढेल, तेवढीच मराठीचीसुद्धा वाढेल हे उघड आहे.

इंग्रजीतील कठीण पारिभाषिक शब्द जसेच्या तसे ठेवायला काय हरकत आहे असे अनेकांचे म्हणणे आहे, त्यावरही आताच खुलासा करणे इष्ट ठरेल. इंग्रजीचे किंवा इंग्रजी माध्यमाचे कितीही स्तोम माजवले असले तरी आजमितीस आपल्या देशातील केवळ १३ ते १४ टक्के लोकांनाच इंग्रजी समजते हे आपल्या साऱ्यांनाच माहिती आहे. उरलेल्यांचे काय? तेव्हा मराठीतील शब्द हे कठीण असले तरी ते ऐकून समजण्यासारखे असतात आणि रूढ केले तर मात्र फारच सहजतेने समजण्यासारखे असतात. 'कोर्टात कॅव्हिएट दाखल केले.' ऐवजी 'न्यायालयात सावधानपत्र दाखल केले.' 'सिविल सूट'ऐवजी 'दिवाणी दावा', इंडेम्निटी बाँड'ऐवजी 'हानिपूर्ती बंधपत्र', 'जस्टा कॉसा'ऐवजी 'न्याय्य कारण', 'रेस्टिट्यूशन ऑफ काँजुगल राइट्स'ऐवजी 'दांपत्य-अधिकारांचे प्रत्यास्थापन' असे शब्द व ते शब्द बोलणारे वकील, न्यायाधीश व पक्षकार तुम्ही नजरेसमोर आणून बघा. मराठीच्या प्रगतीचे हे एक फार भव्य-दिव्य स्वप्न आहे आणि ते मला तुम्हाला दाखवायचे आहे. एकदा डोळ्यासमोर आणून तर बघा. कदाचित प्रथमदर्शनी ते विनोदी वाटण्याची शक्यता आहे. परंतु ते विनोदी नाही. आपल्याच समाजाने वेळोवेळी आपल्याच भाषेची जी काही टर उडवली आहे, त्यामुळे ते आपल्याला आज विनोदी वाटते. पण ही आपली भाषा आहे आणि बहुसंख्यांना समजावे म्हणून आपल्याला ह्याच भाषेत व्यवहार करायला पाहिजे अशी खूणगाठ जर आपण बांधली असती, तर हे विनोदी वाटले नसते व अजूनही तसा प्रयत्न केला तर ते विनोदी वाटणार नाही. सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे आपल्या भाषेतले शब्द ऐकूनच त्याचा अर्थ समजतो, तसा इतर भाषांमधील शब्दांचा समजत नाही. लिहितानाही आपल्या भाषेबद्दल जी एक अंतर्दृष्टी असते, त्यातून तो सहजगत्या बरोबर लिहिला जातो. त्याचे स्पेलिंग आणि अर्थ पाठ करत बसावा लागत नाही. संकल्पना समजतात. त्या बोलून दाखवता येतात. विचार करण्याच्या व संवाद साधण्याच्या बाबतीत परावलंबन राहात नाही. आज अशी परिस्थिती आहे, की वकिलाची मदत घेतल्याशिवाय,

त्याला भरमसाठ पैसे दिल्याशिवाय न्यायालयाची पायरीच चढता येत नाही. तुमच्या-आमच्यासारख्या सुशिक्षितांनाच नाही चढता येत तर गरीब/ अशिक्षितांबद्दल काय बोलायचे? आज ज्यांची आठवण काढण्यासाठी आपण इथे एकत्र जमलो आहोत, त्या सामंतबाई एल०एल०बी० होत्या, आणि त्यांच्या आयुष्यातले कायद्याचे लढे वकिलांची मदत न घेता त्या स्वत: लढत होत्या. मग ती सोसायटीमधील गचीत बांधलेल्या बेकायदा खोलीची गोष्ट असो, नाहीतर मानसरोवराला त्याचे योग्य नाव मानस सरोवर देण्याची गोष्ट असो. तर ही इंग्रजीतील कज्जेदलाली जी आहे, तिने न्यायव्यवस्थेची अन्याय-व्यवस्था करून टाकलेली आहे. न्यायव्यवहाराच्या मराठीकरणाचा हा सारा उपद्व्याप हा तिला शह देण्यासाठी आपल्याला करायचा आहे. त्यासाठी शक्य तेवढे सोपे शब्द घडवायचे. सोपे वाक्प्रयोग घडवायचे, त्यांना प्रतिष्ठा मिळवून द्यायची, त्यांचा प्रचार-प्रसार करायचा, पुस्तके प्रकाशित करायची, आणि ती रूढ करून व्यवहारात आणायची एवढा मोठा पल्ला आपल्याला गाठायचा आहे. आता ह्यांपैकी किती काम भाषा संचालनालयाने पूर्ण करून आपल्या हातात दिले आहे ते आपण आधी पाहू आणि किती काम शिल्लक आहे व ते कसे पूर्ण करायचे ह्याकडे नंतर येऊ.

त्यापूर्वी आणखी एक मुद्दा. वर म्हटल्याप्रमाणे कायद्याची भाषा ही इंग्रजीमध्ये फार फार वर्षांपूर्वी रचली गेली, तेव्हाचे कायदे आपण आजही वाचतो आणि ते समजून घ्यावेच लागतात. आजची कायद्याची इंग्रजी भाषा ही तेव्हापेक्षा पुष्कळ सुकर आहे,पण कमी शब्दांमध्ये जास्त अर्थ ठासून बसवण्यासाठी तेव्हाचीच भाषा वापरली जाते; ती कुणाच्या दडपणाखाली म्हणून नाही; पण एकदा जी बसली ती बसली. शिवाय कायद्याचा अर्थ लावणे हेदेखील एक कठीण काम असते. त्यासाठीही रूढ झालेले शब्द व रूढ झालेले शब्दप्रयोगच वापरणे सोपे पडते. पुढची गोष्ट अशी, की आज कायद्याच्या इंग्रजी मसुदाकारांनाही चांगले इंग्रजी येतच नाही. त्यामुळे तेही कॉपी-पेस्टच करतात. कायद्याचे मुळातून मसुदालेखनच मराठीतून करावे असे माझे व आणखी काही लोकांचे मत आहे. तसे करण्याची भाषेची तयारी पूर्ण झाली आहे. परंतु राजकीय इच्छाशक्तीच्या अभावी ते अजून होत नाही. काँग्रेस, शिवसेना-भाजप किंवा राष्ट्रवादी कोणीही त्यासाठी प्रयत्न केला नाही. शिवसेना-भाजप युतीच्या काळात एक बदल मात्र झाला. तो असा, की कायद्याचे मूळ मसुदे मराठीत तयार केले जातात व नंतर त्यांचा इंग्रजी अनुवाद केला जातो असे शासकीय स्तरावर मानण्यात आले. परंतु प्रत्यक्षात मराठी मसुदाकार नाहीत आणि कायदे मराठीतून तयार होत नाहीत. हा प्रकार आजतागायत तसाच चालू आहे.

मराठीतून जरी मसुदालेखन झाले, तरी कायद्याच्या क्लिष्ट भाषेत फार फरक पडेल असे मला वाटत नाही. त्या भाषेचे सुलभीकरण करून किंवा ती पातळ करून चालणार नाही. पण कायद्याची भाषा जनसामान्यांना शिकवणे मात्र शक्य आहे. ही कायद्याची

अवघड भाषा आणि सामान्य माणूस ह्यांच्यामधली दरी भरून काढण्याचा प्रयत्न मी २००१ साली एक पुस्तक लिहून केला. भूमिसंपादन-अधिनियम हा ब्रिटिशांनी १८९४ साली संमत करून कुणाचीही खासगी जमीन सार्वजनिक प्रयोजनासाठी घेण्याचे अधिकार सरकारला दिले — म्हणजे स्वत:कडे घेतले. ह्या अधिनियमाचा मराठी प्राधिकृत पाठ अत्यंत सोप्या मराठीत समजावून सांगणारे 'भूमिसंपादन अधिनियम — अर्थउकल' हे पुस्तक मी लिहिले. त्यामध्ये कोणत्याही प्रकारची टिप्पणी नाही. फक्त कायदा काय म्हणतो तेवढेच सांगितले आहे. कोणताही मूळ अधिनियम कसा वाचावा हे सांगितले आहे. एवढे एक पुस्तक वाचून अल्पशिक्षित, नवसाक्षर व्यक्तीला कोणताही कायदा नुसता मुळातून वाचून समजून घेता यावा इतपत त्याची तयारी करून देण्यासाठी हे पुस्तक लिहिले. सांगायला आनंद वाटतो, की हा उद्देश सफल झाला. म०शा०चा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीचा पुरस्कार त्याला मिळाला. पंचवीस पानी कायद्यावर ४०० पृष्ठांचे पुस्तक लिहिणे हा माझा एक अविस्मरणीय अनुभव राहिला आहे.

न्यायव्यवहार-कोशात किंवा तसे पाहायचे तर संचालनालयाच्या कोणत्याही कोशात विचारपूर्वक घडवलेले अनेक साधे-सोपे शब्द आहेत. (संस्कृत शब्दांचा आग्रह नाही. उदा० 'ॲड्जर्नमेंट'साठी तहकुबी व संस्थगिती असे दोन पर्याय आहेत. त्यापैकी एक फारसी व दुसरा संस्कृत आहे. ह्यांपैकी कोणताही वापरावा.) जसे की

| | | | |
|---|---|---|---|
| सूओमोटु | - स्वाधिकारे, | परसे | - स्वयमेव |
| इन्स्ट्रुमेंट | - संलेख | मशिनेशन | - कपटव्यूह |
| कॅपिटल ऑफेन्स | - देहान्तदंडनीय अपराध | नलिफाय | - शून्यवत् करणे |

बोऽनफाईड ह्या अव्ययाचा किती प्रकारे अनुवाद केला आहे पाहा :

| | | | |
|---|---|---|---|
| बोऽनफाईड बिलीफ | - प्रामाणिक विश्वास | बोऽनफाईड कॉन्ट्रॅक्ट | - सद्भावमूलक संविदा |
| बोऽनफाईड डिस्प्यूट | - खराखुरा तंटा | बोऽनफाईड मिस्टेक | - अभावित चूक |
| बोऽनफाईड रेसिडन्स | - वास्तविक निवास | | |

आता कुळांची काही उदाहरणे पाहू या :

| | | | |
|---|---|---|---|
| करप्शन | - भ्रष्टाचार | ब्रॉइबरि | - लाचलुचपत |
| ग्राफ्ट | - लुचेगिरी | इन्ड्यूसमेंट | - प्रलोभन |
| ल्युअर | - लालूच | नेपॉटिझम | - आप्तानुग्रह |
| डॅमेज | - नुकसान, हानी | हार्म | - दुखापत |
| इंजरी | - क्षती, इजा | लीजन | - विक्षती |
| मिस्चीफ | - आगळीक | टॉर्ट | - अपकृती |
| रॉंग | - अन्याय | | |

अशा प्रकारे अनेक शब्दांचे इतकेच काय वाक्प्रयोगांचे देखील मराठी पर्याय निश्चित करण्यात आले आहेत. त्यासाठी 'प्रशासन-वाक्प्रयोग' हे पुस्तक काढण्यात आले. त्याचे नाव जरी प्रशासन असले, तरी न्यायविषयक अनेक वाक्प्रयोग त्यामध्ये समाविष्ट आहेत.

उदा० (नो ऑल मेन बाय दीज प्रेझेंट्स) 'या अधिलेखाद्वारे सर्व लोकांस ज्ञात व्हावे.' (माय प्रिझम्शन में बी कन्फर्म्ड) माझी धारणा बरोबर असल्याचे कळवावे.' ('नॉट विथ् स्टँडिंग ॲनिथिंग कण्टेण्ड') 'काहीही अंतर्भूत केलेले असले तरी.' ('नॉउ दीज प्रेझेंट्स विटनेस दॅट') 'आता हा अधिलेख पुढील गोष्टीस साक्षी आहे.'

ह्या दोहोंशिवाय सर्व राज्य व निवडक केंद्रीय अधिनियमही मराठीत केलेले आहेत, ज्यावरून त्या भाषेची शैली स्पष्ट होते. आपण त्याचीही काही उदाहरणे पाहू.

कोणतीही व्यक्ती संसदेच्या दोन्ही सभागृहांची सदस्य असणार नाही, जी व्यक्ती दोन्ही सभागृहांची सदस्य म्हणून निवडली गेली असेल तिने दोहोंपैकी कोणत्याही एका सभागृहातील तिची जागा रिक्त करावी यासाठी संसदेकडून कायद्याद्वारे तरतूद केली जाईल.

(No person shall be a member of both Houses of Parliament and provision shall be made by Parliament by law for the vacation by a person who is chosen a member of both Houses of his seat in one House or the other.)

कोणतीही व्यक्ती संसद व राज्याच्या विधानमंडळाचे सभागृह या दोन्हींची सदस्य असणार नाही, आणि एखादी व्यक्ती संसद व एखाद्या राज्याच्या विधानमंडळाचे सभागृह या दोन्हींची सदस्य म्हणून निवडली गेल्यास, राष्ट्रपतीने केलेल्या नियमांत विनिर्दिष्ट केला जाईल असा कालावधी समाप्त होताच तिने तत्पूर्वी त्या राज्याच्या विधानमंडळातील आपल्या जागेचा राजीनामा दिला नसेल तर तिची संसदेतील जागा रिक्त होईल.

(No person shall be a member both of Parliament and of a House of a Legislature of a State, and if a person is chosen a member of both, Parliament and of a House of the Legislature of a State, then, at the expiration of such period as may be specified in rules made by the President, that person's seat in Parliment shall be vacant, unless he has previously resigned his seat in the Legislature of the State.)

राज्याची विधानसभा सत्रासीन असेल त्याव्यतिरिक्त अथवा एखाद्या राज्यात विधानपरिषद असेल तेथे विधानमंडळाची दोन्ही सभागृहे सत्रासीन असतील त्याव्यतिरिक्त कोणत्याही वेळी, राज्यपालाने तत्काळ कारवाई करणे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल राज्यपालाची खात्री पटल्यास, त्याला त्या परिस्थितीनुसार जरूर वाटतील असे अध्यादेश प्रख्यापित करता येतील.

(If any time, except when the Legislative Assembly of a State is in session, or where there is a Legislative Council in a State, except when both the Houses of the Legislature are in session, the Governor is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action, he may promulgate such Ordinances as the circumstances appear to him to require.)

कायद्याच्या परिभाषेत शब्दांनी बनलेल्या ह्या भाषेशिवाय आणखी बरेच बारकावे असतात. त्याबद्दलही स्पष्ट धोरणे आखलेली आहेत. जसे की

( १ ) अधिनियमातील मुद्द्यांना कलम म्हणायचे, तर संविधानातील मुद्द्यांना अनुच्छेद् म्हणायचे.

( २ ) कलमाचे बरेच उपविभाग असतात. त्यांची नावे व ती कशा प्रकारे एकाखाली वा एकापुढे एक लिहावीत तेही ठरलेले असते. उदा०

(१) पोटकलम - कलमाचा पोटविभाग. हे १, २, ३ अशा क्रमांकांनी दर्शवलेले असतात.

(२) कलमाचे पोटविभाग जेव्हा एका वाक्याचे भाग म्हणून येतात तेव्हा त्यांना खंड (क्लॉज) म्हणतात. हे केंद्रीय अधिनियमांमध्ये क, ख, ग, घ अशा वर्णांनी तर राज्य अधिनियमांमध्ये अ,ब,क,ड अशा वर्णांनी दर्शवले जातात.

(३) खंडांच्या पोटविभागांना उपखंड म्हणतात.

(४) कायद्यातील कलमे हे सर्वसाधारण नियम असतात. कधी त्यांना काही अपवादही असतात, जे त्या कलमांखालीच 'परंतु' असे म्हणून पुढे लिहिले जातात. त्यांना परंतुक (प्रोव्हिजो) असे म्हणतात.

(५) कलमांमधील एखादा शब्द किंवा संकल्पना स्पष्ट नसेल तर तिचा अर्थ पूर्णपणे स्पष्ट करण्यासाठी येथे स्पष्टीकरणही दिले जाते.

( ३ ) अधिनियम राज्याचा की केंद्राचा हे समजण्याची सोपी खूण म्हणजे केंद्रीय अधिनियमांचे नाव नुसतेच असते. 'भूमिसंपादन अधिनियम १८९४', त्यामध्ये 'भारत' असे म्हटलेले नसते. ह्याउलट राज्याच्या अधिनियमांमध्ये नावापूर्वी 'महाराष्ट्र' किंवा 'मुंबई' असे म्हटलेले असते. उदा० 'महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम.'

( ४ ) अधिनियमांमध्ये बदल किंवा सुधारणा केल्या जातात तेव्हा सुधारित अधिनियमांमध्ये बदललेला मजकूर चौकोनी कंसात घालून दाखवला जातो. त्याला तळटीप

देऊन ती सुधारणा केव्हा व कशी केली ते नमूद केले जाते. सुधारणेअन्वये मजकूर वगळण्यात आला असेल तर चौकोनी कंसात टिंब टाकून पूर्वीचा मजकूर आता नाही हे दर्शवले जाते.

( ५ ) राष्ट्रपती व पंतप्रधान ही आपल्या राज्यव्यवस्थेतील सर्वोच्च पदे असली तरी संविधानात वा अन्य कायद्यांमध्ये त्यांचा उल्लेख तो राष्ट्रपती, तो पंतप्रधान असाच केला जातो.

( ६ ) कायद्याच्या भाषेत अधिनियमांचा उल्लेख केवळ नावानेच नाही, तर क्रमांकानेही केला जातो. जसे की 'फौजदारी-प्रक्रिया-संहिता' ही '१९७४चा दोन' अशा क्रमांकाने ओळखली जाते. (कॉरनर्ज ॲक्ट) अपमृत्युनिर्णेता अधिनियम' हा 'सन १८७१चा मुंबई चार' म्हणवला जातो कारण तेव्हा महाराष्ट्र राज्याची स्थापना झाली नव्हती.

थोडक्यात सांगायचे तर ***विधेयकाचा मसुदा मराठीतून लिहिण्याची, न्यायालयांमधून मराठीत निर्णय देण्याची व कायद्याचे उच्च शिक्षण मराठीतून देण्याची संपूर्ण सज्जता भाषा-संचालनालयाने करून दिली आहे.*** ह्या तिन्ही गोष्टी आतापर्यंत होऊन जायला पाहिजे होत्या, त्याऐवजी आजचे चित्र काय, तर आपल्या दिवाणी दाव्याचा निकाल आपल्या बाजूने लागला की विरुद्ध बाजूने, हे समजून घेण्यासाठी एखाद्या खेडुताला सुशिक्षित म्हणजे इंग्रजी येणाऱ्या माणसाचे पाय धरावे लागतात. कायद्याचे शिक्षण घेण्याची तीव्र इच्छा मनात बाळगून लहान गावांतून पुण्यासारख्या शहरात येणारे होतकरू तरुण- तरुणी केवळ इंग्रजी येत नसल्यामुळे शिक्षणप्रक्रियेच्या बाहेर फेकले जातात. अधिनियम हे शासनाकडून मराठीतही प्रकाशित केले जातात ह्याचा सामान्यजनांना तर सोडाच पण न्याययंत्रणेतील रथी-महारथींनाही पत्ता नाही. (इतकेच नव्हे तर मंत्रालयातील विधी व न्याय विभागातील अनेक अधिकाऱ्यांनाही ह्याचा पत्ता नसतो असा माझा स्वत:चा अनुभव आहे.) त्यांच्या लेखी मराठी ही फक्त स्वयंपाकघरात व माजघरात बोलायची भाषा आहे. अधिनियमांची अधिकृत शासकीय पुस्तके - मराठीच काय तर इंग्रजीदेखील - त्यांच्यापर्यंत पोहोचत नाहीत. त्यांच्यापर्यंत पोहोचतात ती फक्त खासगी प्रकाशनेच.

असे का झाले असेल? ह्या क्षेत्रात एवढे काम झालेले असूनही त्याचा उजेड का पडला नाही आणि आज महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर ५५ वर्षांनी ती वाट आणखीच बिकट का वाटते आहे त्याची कारणे पाहू :

( १ ) राजभाषा मराठीचा वापर सुरू झाल्याबरोबर इथल्या थोर. जाणत्या लोकांनी तिची थट्टाच केली. आचार्य अत्रे ह्यांनी पदनाम कोशाला बदनाम कोश म्हटले तेव्हापासून हीच परंपरा सुरू आहे. एवढे मोठेमोठे लोक भाषा सल्लागार मंडळावर व त्याच्या विविध उपसमित्यांवर होते, परंतु त्यांनी केलेल्या कामाचीही काही पत्रास महाराष्ट्राने ठेवली नाही. त्यामुळे शासकीय मराठी ही टर उडवायची गोष्ट आहे असाच आजही जनमानसाचा समज आहे.

( २ ) संचालनालयाच्या कारभारामध्ये ज्या काही त्रुटी राहिल्या, त्या नंतर कधीच दुरुस्त करण्यात आल्या नाहीत. कोणाला तो विचारही सुचला नाही. उदा० संचालनालयाने तयार केलेली परिभाषा वापरण्याची सक्ती बालभारती किंवा विद्यापीठ-ग्रंथनिर्मिती-मंडळ (जेव्हा ते होते तेव्हा) यांवर करण्यात आली नाही. तसेच संचालनालयाने तयार केलेल्या कोशांची विक्री करण्याचे अधिकार त्याला दिले नाहीत. त्यांची जाहिरात वा प्रचार-प्रसार करण्याचा कोणताही कार्यक्रम शासनाकडे नव्हता व नाही. त्यामुळे ज्यांच्यासाठी निर्माण केली, त्यांच्यापर्यंत ही भाषा पोहोचलीच नाही.

( ३ ) गेल्या दोन पिढ्यांमध्ये आपल्या समाजाची एकूण भाषेविषयीचीच अनास्था इतकी वाढली, की चांगल्या भाषेत लिहिलेले काहीच आज आपल्याला दिसत नाही. मिश्र-भाषा हीच तरुणांची बोलायची भाषा झाली. पालकांनी मुलांच्या मराठी बोलण्या-वरच बंधन आणले. ह्या साऱ्याचा परिणाम जीवनाच्या सर्व क्षेत्रांत दिसतो आहे. मराठीतला एखादा नमुना किंवा शासन-निर्णय हा चांगल्या मराठीत नसतो कारण तो लिहिणारा जो प्रत्यक्ष माणूस आहे त्याला चांगले मराठी येत नाही व आले पाहिजे असे वाटत नाही. व्याकरण माहिती नाही. प्रमाण भाषेत लिहिता आले पाहिजे असे कुठलेही बंधन त्याच्यावर नाही. त्यामुळे सगळाच आनंद आहे. मला स्वत:लाही अनेकदा शासकीय कागदपत्रांमधील मराठी कळत नाही. प्रसारमाध्यमा-मधली जेमतेम कळते; पण ती वाचताना क्लेश होतात. कारण भाषा-संचालनालय नसून मराठीकडे पाठ फिरवणारा व तीबद्दल न्यूनगंड बाळगणारा समाज आहे.

( ४ ) कायद्याच्या मराठी भाषेचा विचार करताना आपल्याला जागतिकीकरणाकडे दुर्लक्ष करून अजिबात चालणार नाही. मराठी ही स्थानिक भाषा आहे, परंतु जागतिकीकरणाने स्थानिकता व वैश्विकता ह्यांच्यामध्ये झुंज लावून वैश्विक तेच सारे श्रेष्ठ व जे काही स्थानिक असेल ते मूल्यहीन असा पवित्रा घेतला आहे. आजूबाजूला दिसणारा सर्व समाज, एकीकडे मराठीला भवितव्य नाही तर दुसरीकडे इंग्रजी जमत नाही, एकीकडे परंपरेचा अभिमान वाटतो तर दुसरीकडे वैश्विक बनण्याची घाई झाली आहे अशा संभ्रमात गटांगळ्या खाताना दिसतो आहे. खरेतर ह्या दोहोंचा समन्वय साधणे कठीण नाही. इतकेच काय, जागतिकीकरणाच्या युगातही आपल्या

भाषेतून न्यायव्यवहार व शासनव्यवहार करणे, ठरवले तर काहीच कठीण नाही. आजूबाजूचे अनेक देश असे करताना दिसत आहेत. फक्त ते ठरवावे लागेल व स्वत:शी प्रामाणिक राहून अंमलात आणावे लागेल.

(५) शेवटचे पण सर्वात महत्त्वाचे कारण असे, की कायद्याची मराठी भाषा निर्माण करणारी, तिचे जतन व वाढ करणारी एकच संस्था आहे, व ती म्हणजे भाषा-संचालनालय; पण आज तिचे तेज पूर्णपणे लोप पावले आहे. हे सांगताना मला अतिशय खेद होतो; पण सांगणे आवश्यक आहे. मूठभर स्वार्थांधांच्या तावडीत सापडून ती अंधकाराच्या गर्तेत दिवसेंदिवस अधिकाधिक खोल जात आहे. पूर्वीच्या सामान्य-प्रशासन-विभागाकडून संचालनालय नवीन स्थापन झालेल्या मराठी-भाषा-विभागाकडे सोपवण्यात आले खरे; पण त्याने काहीच निष्पन्न झाले नाही. आज नोकरशाही, शासनाची दारुण अनास्था ह्याच्यासोबतच अंतर्गत कलह व जातीयतेचा रंग चढवलेले राजकारण ह्यांमुळे त्याची पूर्ण दैना उडाली आहे. इ०स० २००४ पासून म्हणजे गेल्या १२ वर्षांत संचालनालयास पूर्णकालिक संचालक मिळालेला नाही. संचालनालयाच्या कामाची काहीच जाणीव नसलेले वा कधीकधी भाषाविषयाची आस्था व दृष्टी नसलेले अधिकारी त्या पदावर नियुक्त केले जात आहेत. किंवा एखाद्याला तशी थोडीबहुत आस्था असली, तरी एवढ्या कटकटींचे कार्यालय १० टक्के जादा प्रभार म्हणून स्वीकारण्यास कोणाला स्वारस्य असणार? सामान्य-प्रशासन-विभाग (साप्रवि) मध्ये तर ह्या पदावर नियुक्तीसाठी 'काळ्या पाण्यावर पाठवणे' असा शब्दप्रयोग रूढ आहे! ज्यांना नोकरी सोडणे शक्य होते, असे अनेक गुणी कर्मचारी स्वेच्छानिवृत्ती घेऊन वा अन्य मार्गांनी सोडून गेले. उरलेल्या साध्यासुध्या कर्मचाऱ्यांना तिथे एकेक दिवस कंठणे दुष्कर झाले आहे. ह्या मानसिक तणावाचा त्यांच्या आरोग्यावरही परिणाम होत आहे. म्हणून धैर्य गोळा करून मी आपल्याशी एवढे बोलले.

भाषा-संचालनालय हे शासकीय कार्यालय असले म्हणून काय झाले? आपण सर्वजण मराठीचे प्रेमी आहात. त्या नात्याने, आपल्याला मराठीची परिभाषा उपलब्ध करून द्यावी, अमुद्रित कोश मुद्रित करून तातडीने उपलब्ध करून द्यावेत अशी मागणी शासनाकडे करता येऊ शकते. त्या मागणीचा दबाव जर निर्माण झाला, तर ती पूर्ण करून देण्यासाठी शासनाला संचालनालयाचे ढासळलेले प्रशासन सावरावेच लागेल. महाराष्ट्राच्या जनतेला ही मागणी करण्याचा पूर्ण हक्क आहे. काही वर्षांपूर्वी मुंबईच्या मराठी-अभ्यास-केंद्राने हा मुद्दा लावून धरला होता. आताही मी सर्व भाषाप्रेमींना व्यक्तिगत पातळीवरून व मराठी-अभ्यास-परिषदेला संस्थात्मक पातळीवरून असे कळकळीचे आवाहन करते, की त्यांनी 'कला जगवायची असेल तर कलावंताला जगवा.' ह्या न्यायाने संचालनालयाचा मुद्दा मनात




अनुक्रमणिका

धरावा. त्याने कायद्याच्या मराठी भाषेचे तर भले होईलच. पण त्याशिवाय सामंतबाईंना ती चांगली श्रद्धांजली ठरेल.

मी, कायद्यांचा अनुवाद करताना आलेल्या अडचणी, न्यायव्यवहार कोश तयार करताना आलेल्या अडचणी, त्यावर मात केली का किंवा का नाही करता आली वगैरेवर विवरण अपेक्षित असेल, तर त्यावर मी एवढेच सांगू शकते, की अशा काही अडचणी वगैरे फार आलेल्या नाहीत. एकतर आमचे पूर्वसुरी एवढे थोर होते, की त्यांनी आमची वाट सोपी करून ठेवली होती. माझ्या एकवीस वर्षांच्या कार्यकाळात मला एकही असा प्रसंग आठवत नाही, की जिथे मराठीमुळे मर्यादा आली. इंग्रजीच कळत नाही अशी वेळ मात्र आली, पण ती चूक इंग्रजी लिहिले होते, म्हणून आली. अशा प्रसंगात विधी व न्याय विभागाला फोन करून विचारले, की तुम्हाला नक्की काय म्हणायचे आहे आणि त्याप्रमाणे अनुवाद केला. सगळ्यात महत्त्वाची गोष्ट अशी, की कायदा हा एक तर्कशुद्ध विषय आहे. तर्काच्या मार्गावरून व विवेकाची कास न सोडता चालत राहिले की मार्ग सापडतोच. तसा सगळ्यांना सापडेल. सापडलाच पाहिजे. ■

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

वृत्तपत्रे आणि पुस्तक-नोंदणी-अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे-नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून 'मराठी-अभ्यास-परिषद-पत्रिका : भाषा आणि जीवन' या नियतकालिकाची मालकी अन्य बाबींसंबंधीचे निवेदन :

(१) **प्रकाशन-स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

(२) **प्रकाशनाची कालनियतता : त्रैमासिक :** हिवाळा (जानेवारी), उन्हाळा (एप्रिल), पावसाळा (जुलै) व दिवाळी (ऑक्टोबर).

(३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, पत्ता :** आनन्द काटीकर, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, बी 5/16, सनसिटी, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.
**राष्ट्रीयत्व :** भारतीय.

(४) **मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे 411 051.

(५) **संपादकाचे नाव, पत्ता :** प्र०ना० परांजपे, एच १, क्लॅरियन पार्क, औंध, पुणे 411 007.
**राष्ट्रीयत्व :** भारतीय.

मी, आनन्द काटीकर, असे प्रतिज्ञापूर्वक सांगतो की, वर दिलेला तपशील माझ्या महितीप्रमाणे आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

- **आनन्द काटीकर,** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद

# मराठीची नामानुसारी व्यवस्था

– नीती बडवे

## प्रास्ताविक

आपली भाषा आपल्याला येत असते. ती आपल्या इतकी अंगवळणी पडलेली असते, की आपण तिचे त्रयस्थपणे निरीक्षण करू शकत नाही. पण आपली स्वभाषा आपण जेव्हा परभाषा म्हणून शिकवतो, तेव्हा तिच्याकडे परक्या नजरेतून बघायला लागतो. अशा वेळी आपल्या भाषेचे काही विशेष प्रकर्षाने जाणवायला लागतात.

मराठी परभाषा म्हणून शिकवताना मला खूप वर्षांपूर्वी सर्वप्रथम जाणवलेली गोष्ट म्हणजे युरोपीय भाषांमध्ये वारंवारितेत वरचा क्रमांक असलेला धातू 'to have' हा मराठीत आणि इतरही पुष्कळ भारतीय भाषांमध्ये आढळत नाही. मराठीत आपण असा फरक करतो : 'मी मुलगा आहे.' आणि 'मला मुलगा आहे.' / 'माझ्याकडे पुस्तक आहे.'

दुसरी गोष्ट म्हणजे बऱ्याच युरोपीय भाषांमध्ये 'आहे' आणि 'असते' अशी दोन रूपे आढळत नाहीत. म्हणून ह्या रूपांमधला फरक तिथल्या विद्यार्थ्यांना समजावून सांगणे कठीण असते. पण 'हत्तीला नेहमी दोन दात असतात', 'ह्या हत्तीला मात्र एकच दात आहे.', अशा उदाहरणावरून तो स्पष्ट करता येतो.

### नामकेंद्रित–वाक्यरचना

मराठीचा आणखी एक विशेष म्हणजे मराठीमधली नामानुसारी किंवा नामकेंद्रित-वाक्यरचना. आपण आज इथे चर्चा करणार आहोत, ती प्रामुख्याने ह्या गुणधर्माची. ह्या संदर्भात आपण खालील पाच मुख्य मुद्द्यांचा विचार करू या : संख्यात्मक विचार, क्रियापदांची लिंगानुसारी रूपे, लिंग-वचनलक्षी क्रियाविशेषणे, पदानुबंधांची विशेषणात्मक रूपे आणि धातुसाधितांचा वापर.

### ( १ ) संख्यात्मक विचार

मराठीच्या संदर्भात आपल्याला सहज जाणवणारी गोष्ट म्हणजे धातूंची मोजकी संख्या. ह्यासंबंधी शास्त्रशुद्ध ठाम विधान करण्यासाठी लागणारी संग्रहित संख्यात्मक माहिती किंवा डेटाबेस आपल्याकडे असल्याचे ऐकिवात नाही. विस्तृत कॉर्पस तयार करून शब्दांची वारंवारिता मोजण्यासाठी पाया घातला गेलेला नाही. ह्यातून मार्ग काढण्यासाठी शब्दकोश वापरून काही संख्यात्मक माहिती गोळा केली आहे. हा मार्ग शास्त्रशुद्ध नसला तरी

मिळालेली माहिती दिशादर्शक म्हणून उपयोगी पडेल.

ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसच्या 'इंग्रजी-मराठी' शब्दकोशात मूळ इंग्रजी नोंदींचा मराठीत अर्थ दिलेला आहे. 'A' अक्षरांनी सुरू होणाऱ्या साधारण ९०० नोंदी आहेत. त्यामध्ये १७३ इंग्रजी धातूंच्या नोंदी आहेत. ह्या धातूंचा मराठीत अर्थ देताना वापरण्यात आलेल्या मराठी धातूंची संख्या फक्त ४८ आहे. ह्यात अर्थात ठरावीक मराठी धातूंबरोबर इतर शब्दप्रकारांचा वापर करण्यात आला आहे. त्यात अपेक्षेप्रमाणे 'करणे' ह्या धातूचा उपयोग सर्वात जास्त वेळा झाल्याचे लक्षात येते.

नंतर वीरकरांच्या मराठी-इंग्रजी शब्दकोशातल्या नोंदी बघितल्या. त्यामध्ये मराठी शब्दांच्या 'अ' अक्षराने सुरू होणाऱ्या साधारण १,६०० नोंदी आहेत. त्यामध्ये स्वतंत्र धातू म्हणून वर्गवारी करता येईल अशा फक्त २१ धातूंच्या नोंदी आहेत.

आणखी एका संदर्भाचा इथे विचार करू या. लांगानशाईडच्या जर्मन-इंग्रजी शब्दकोशातल्या नोंदी बघितल्या. 'A' अक्षराने सुरू होणाऱ्या - 'ab' अक्षरापर्यंतच्या नोंदी बघितल्या. 'ac' अक्षर सुरू झाल्यावर मोजणी थांबवली. ह्या सुमारे ८०० नोंदी आहेत. त्यांपैकी ३४५ धातू आहेत.

मराठीत धातूंची संख्या मोजकीच आहे, ह्याचे तीन परिणाम दिसतात. पहिला म्हणजे एकाच धातूचे विविध अर्थ आणि उपयोग. ह्या संदर्भात 'मराठी भाषेतली लागलागी आणि लावालावी.' (भाषा आणि जीवन, अंक २, उन्हाळा, १९८९) हा लेख जरूर पुन्हा पाहावा. अशी कित्येक उदाहरणे आहेत जिथे 'लाग' ह्या धातूचा प्रत्येक वेळी वेगळ्या अर्थाने उपयोग केलेला दिसतो. जसे पुढील शब्दांबरोबर 'लाग'चा उपयोग : गाडी/भूक/उचकी/दही/भाजी/गाणे/बोलणे/करायला/इ० इ० दुसरी गोष्ट म्हणजे 'करणे', 'काढणे', 'लावणे', 'होणे', अशा धातूंची खूप जास्त वारंवारिता. आणि तिसरी गोष्ट म्हणजे नामे आणि धातू ह्यांच्या अतूट जोड्यांचे खूप जास्त प्रमाण. जसे : खोड मोड, टाहो फोड, चटका बस, काहूर माज, ठिय्या दे, उसण भर, तग धर, दूध नास, स्फुरण चढ, पिच्छा पुरव, इ० इ० ह्या जोड्यांमध्ये मोड, फोड, बस, दे अशा धातूंचा मूळ शब्दशः अर्थ बऱ्याच अंशी लोप पावतो.

**( २ ) क्रियापदांची लिंगानुसारी रूपे**

पुरुष आणि वचनाप्रमाणे क्रियापदाची रूपे बदलणे हे पुष्कळ इंडोयुरोपीय भाषांमध्ये दिसते. मराठीमध्ये आणि इतरही बऱ्याच भारतीय भाषांमध्ये धातूंची पुष्कळशी रूपे लिंग-अनुलक्षी (gender sensitive) असतात. साधा वर्तमान काळ : एक वचन (मी जाते, तू जातेस, ती जाते, इ०), अपूर्ण वर्तमानकाळात 'ती जात आहे/ ती जाते आहे.' अशी दोन्ही रूपे आढळतात. पण बोली (contracted form) भाषेमध्ये मात्र 'ती जातेय/ तो जातोय' अशीच रूपे वापरात आहेत.

भूतकाळाच्या सर्व प्रकारांत एकवचनाची सर्व रूपे आणि तृतीय पुरुष बहुवचन लिंगाप्रमाणे बदलते. अपूर्ण भूतकाळात (तो जात होता/ ती जात होती). 'जा' धातूची रूपे बदलत नाहीत, पण 'अस' धातूची भूतकाळी रूपे लिंगानुसारीच आहेत. साधा भूतकाळ (ती गेली, इ०), पूर्ण भूतकाळ (ती गेली आहे, इ०), 'च' लागून होणारा रीती भूतकाळ (ती रोज लवकर जायची) आणि भूत-भूतकाळ (ती गेली होती, इ०) ही रूपे लिंगानुसारीच आहेत.

मराठीमध्ये भविष्यकालदर्शक 'च' लागून होणारी रूपेही (ती उद्या जायची आहे.) लिंगाप्रमाणे बदलतात, पण साध्या भविष्यकाळात ती बदलत नाहीत (ती/तो जाईल). पण हिंदीमध्ये तर भविष्यकाळातली रूपेही लिंगाप्रमाणे चालतात (वह जाएगा/ जाएगी).

मराठीमध्ये भूतकाळाप्रमाणेच विध्यर्थातही सकर्मक धातूंच्या कर्मणी रचना होतात आणि क्रियापदेही लिंगाप्रमाणे बदलतात (तिने अभ्यास केला/ करावा, काम केले/ करावे, पूजा केली/ करावी, इ०). अकर्मक क्रियापदांची रूपे मात्र तृतीय पुरुष एकवचनात असतात (ती गेली, पण तिने जावे).

'आहे', 'पाहिजे', 'नये' अशा क्रियापदांची रूपे लिंगाप्रमाणे बदलत नाहीत, पण द्वितीय पुरुषात 'स' किंवा बहुवचनात 'त' प्रत्यय घेतात.

### (२.१) एका वाक्यात दोन क्रियापदे

जर्मन, फ्रेंच, स्पानिशसारख्या भाषा शिकताना 'लिंग-वचनाप्रमाणे बदलते ते नाम, वचन-पुरुष-कालदर्शक ते क्रियापद' असे शिकवले जाते. क्रियापदाची ही व्याख्या मराठीला लागू पडत नाही. इंग्रजी किंवा जर्मनमध्ये एका वाक्यात एकच क्रियापद 'चालवलेले' (finite form) असते. बाकी 'न चालणारी' रूपे असतात (talking, talked, to talk). म्हणून मराठीत 'तो जात आहे' की 'तो जातो आहे' म्हणायचे, असा प्रश्न पडू शकतो. हिंदीमध्ये चालू वर्तमानकाळात एकच रचना असल्यामुळे हा प्रश्न उद्भवत नाही. जसे : 'वह जाती/ जाता है' हे लिंगदर्शक रूपच वापरले जाते. मराठीमध्ये इतर ठिकाणी, म्हणजे भूतकाळाच्या रूपांमध्ये किंवा विध्यर्थाच्या रूपांमध्ये सर्रास दोन्ही क्रियापदांची समांतर रूपे वापरली जातात. जसे : 'ती गेली होती', 'तिला जावं लागलं', 'आम्ही गेलो होतो'. इथे दोन्ही धातू 'चालवलेले' दिसतात आणि ते एकच प्रत्यय घेतात. म्हणजे मुख्य धातू आणि साहाय्यक धातू हा फरक जसा इंग्रजी किंवा जर्मनमध्ये केला जातो तसा तो मराठीत किंवा हिंदीमध्येही केलेला दिसत नाही. जसे : 'वह गयी थी', 'वह जाती थी' अशी तोच प्रत्यय असलेली दोन रूपे दिसतात.

ह्यावरून असे वाटते, की मराठीमधले क्रियापद बरेचदा विशेषणाचे रूप घेते. मराठीमध्ये 'चालणारी' विशेषणे एकवचनात आ (पुं), ई (स्त्री), ए (नपुं), जसे : मोठा, मोठी, मोठे/ मोठं आणि बहुवचनात ए (पुं), या (स्त्री), ए/ई (नपुं) जसे : मोठे,

मोठ्या, मोठी/ मोठे असे प्रत्यय घेतात. हेच भूतकाळातले तृतीय पुरुषाचे प्रत्यय आहेत (गेला, गेली, गेलं आणि गेले, गेल्या, गेले/ गेली). आपण पाहतो, की महाराष्ट्राच्या काही भागांत क्रियापदाची 'तो गेलेला, ती गेलेली, ते गेलेले', अशी रूपे वापरात आहेत. ही म्हणजे विशेषणाचीच रूपे झाली!

जर्मनमध्ये पास्ट पार्टिसिपल्स विशेषणाप्रमाणे वापरली जातात आणि ती नामाच्या आधी आली तर नामाप्रमाणे चालततातदेखील. पण ती क्रियापदाची जागा घेत नाहीत.

**( ३ ) लिंग-वचन-अनुलक्षी क्रियाविशेषणे :**

नामे आणि विशेषणे लिंग-वचनाप्रमाणे चालतात. पण मराठीत क्रियाविशेषणेही लिंग-वचनाप्रमाणे चालतात, हे लक्षात आल्यावर मला त्याचे खूपच आश्चर्य वाटले. 'भाषा आणि जीवन'च्या अंक २, उन्हाळा १९८८ मध्ये 'एक कोडे' ह्या शीर्षकाखाली मी ह्यासंबंधी प्रश्न उपस्थित केला होता. पण त्यावर काहीही प्रतिक्रिया आल्याचे समजले नाही. तिथे दिलेली काही उदाहरणे खालीलप्रमाणे आहेत :

(अ) 'तो अनायसा आला आहे ( ती अनायशी आली आहे ), तर त्याबद्दल सांगून टाक.'

(आ) 'तू भर उन्हाची कशाला आलीस/ तू भर उन्हाचा कशाला आलास!'

( इ ) 'ती केव्हाची वाट बघत्येय/ तो केव्हाचा वाट बघतोय.''

( ई ) 'ती ओझरती डोकावून गेली/ तो ओझरता डोकावून गेला.'

( उ ) 'चेंडू कसला जोरात आला/ गाडी कसली जोरात आली.'

ह्या उदाहरणांमध्ये प्रश्न असा पडतो की (अ) तो अनायसा की येणे अनायसे? (आ) तू उन्हाची की येणे उन्हाचे? (इ) ती केव्हाची की वाट पाहणे केव्हाचे (ई) ती ओझरती की डोकावणे ओझरते (उ) चेंडू कसला की जोरात येणे कसले. शेवटच्या उदाहरणात तर 'कसला' हे क्रियाविशेषणही नाही. ते विशेषणाचे विशेषण आहे! म्हणजे 'जोरात' ह्या क्रियाविशेषणाला पुष्टी देणारा शब्द (intensifier) आहे. म्हणजे 'very fast' मधल्या 'very' सारखा.

ही उदाहरणे पहिली, की मराठीमधला कोणताही विकारी शब्द आपल्या लिंगवचनाप्रमाणे चालतो की काय असे वाटायला लागते! ('छान'सारखे अविकारी शब्द मात्र 'चालत' नाहीत.) काही वाक्यांमध्ये तर इतर सर्व शब्द एका नामाप्रमाणे 'चालत' असलेले दिसतात. जसे : 'तो दमलेला माणूस तीन्हीसांजचा आला आणि म्हणाला...' ह्या उदाहरणात 'आणि' हे अव्यय सोडून इतर पाचही शब्द 'माणूस' ह्या नामाप्रमाणे चालतात. विशेषणे, क्रियाविशेषणे आणि क्रियापद ह्यांना एकच प्रत्यय लागतो. हे एकटेदुकटे उदाहरण नाही. मराठीची ही लकब असल्यामुळे अशी असंख्य उदाहरणे सापडतात.

### (४) पदानुबंधांची विशेषणात्मक रूपे

मराठीची आणखी एक लकब म्हणजे मराठीत एखादा वाक्यखंड किंवा सबंध वाक्यच्या वाक्य विशेषणाची जागा घेऊ शकते आणि विशेषणाचे प्रत्ययही घेते. जसे : 'हे नवे पुस्तक तू जरूर वाच. मी ते काल जवळच्या ग्रंथालयातून आणले.' हेच आपण असेही म्हणू शकतो : 'मी काल जवळच्या ग्रंथालयातून आणलेले हे नवे पुस्तक तू जरूर वाच.' अशा रचना आपण बोलताना सर्रास वापरत असतो. जसे : 'मैत्रिणीने आजीला सांगितलेला निरोप आजी मला सांगायला विसरली.' किंवा 'तिने गेल्या पाच वर्षांमध्ये जपान/आणि इतर देशांतून पाठवलेले फोटो मी जपून ठेवले आहेत.' मराठीच्या प्रकृतीला अनुसरून ह्या सहज रचना आहेत. ही लकब मराठीप्रमाणे हिंदी आणि इतर भारतीय भाषांमध्ये दिसते, तशीच ती जर्मनमध्येही दिसते. जर्मनमध्ये 'ते मी काल टेबलावर ठेवलेले पुस्तक' अशा रचना येतात, पण जर्मनमध्ये पल्लेदार वाक्यांचा उपयोग बहुतांशी लेखी वैज्ञानिक भाषेत आढळतो.

### (४.१) क्रियाविशेषणापासून विशेषणे

मराठीमध्ये क्रियाविशेषणांपासून विशेषणे तयार करण्याची खूप पद्धत आहे. ही विशेषणे प्रायः विकारी असतात. जसे : 'त्या कोपऱ्यावर औषधाचे दुकान आहे > ते कोपऱ्यावरचे औषधाचे दुकान', किंवा 'इथला रस्ता, तिथली गर्दी, इकडची बाजू, तिकडचा पूल, समोरचे मैदान, शेजारचे जोशी, झाडावरचे आंबे, आकाशातल्या चांदण्या' अशा रचना अगदी सहज आणि सर्रास वापरल्या जातात.

ह्या सर्व उदाहरणांवरून असे दिसते, की मराठीमध्ये धातू आणि क्रियाविशेषणांना विविध प्रकारे विशेषणांची जागा घ्यावी लागते. म्हणून मराठीमध्ये 'चालणाऱ्या' शब्दांची संख्या प्रचंड आहे. मराठीचे 'कॉर्पस' (corpus) तयार करून संख्याशास्त्रीय माहिती गोळा करणे आवश्यक आहे. पण हे एकट्या शिलेदाराने करण्याचे काम नाही, ते संस्थात्मक पातळीवरच व्हायला हवे.

### ( ५ ) धातुसधितांची नामे आणि विशेषणे

वर्तमानकाळातली (गाणारा पक्षी, हसणारे बाळ, सळसळणारी पाने) किंवा भूतकाळातली (करपलेला भात, उकळलेले पाणी, रंगलेली मैफल) धातुसाधिते विशेषणांसारखी वापरणे, तसेच मूळ धातू नामासारखे (खाणे, गाणे, फिरणे) वापरणे हे खूप भाषांमध्ये प्रचलित आहे. मराठीत अशा नामधातूंची सामान्य रूपे करून, त्यांना प्रत्यय लावून (खाण्यासाठी, करण्यातून, बोलण्याला) आपण ती सर्रास वापरत असतो. हिंदी, कानडी, जर्मनमध्येही असा वापर दिसतो. इंग्रजीमध्येही 'her going there' अशी 'ing' लावलेली रूपे आढळतात.

मराठीचा वेगळेपणा धातूंच्या भूतकाळातल्या रूपांमध्ये आहे. 'केल्यास, केल्याने. केल्याला, केल्यापासून' असे शब्द भूतकाळी रूपांचा पारंपरिक विभक्तिप्रत्यय लावून किंवा 'केल्यावर, झोपल्यामुळे' अशी शब्दयोगी अव्यये जोडून आपण वापरतो. आपण मराठीमध्ये 'ती आल्याला/ गेल्याला चार दिवस झाले.' अशा रचना सर्रास वापरत असतो. अशी रूपे हिंदीत सहज आढळत नाहीत. 'उसके जाने के बाद' अशी रचना असते, पण 'उसके गये के बाद' अशी रचना सापडत नाही. फक्त 'बम्बैय्या' हिंदीमध्ये 'वह गयेला, आयेला' अशी रूपे आढळतात. ती बहुधा मराठीच्या प्रभावाखाली तयार झालेली असावीत.

**समारोप**

आपण वर बघितल्याप्रमाणे मराठीमध्ये क्रियापदांची संख्या कमी आहे. सर्व काळांमध्ये क्रियापदांची लिंग-वचन-अनुलक्षी अशी बदलणारी रूपे बहुसंख्य आहेत. तसेच विध्यर्थातही धातूंची लिंग-अनुसारी रूपे आढळतात. क्रियाविशेषणे किंवा क्रियाविशेषणांपासून तयार झालेली विशेषणे ही नामाच्या लिंगाप्रमाणे बदलतात. धातू किंवा धातुसाधिते नामासारखी किंवा विशेषणांसारखी वापरली जातात. भूतकाळी रूपांनाही नामानुसार प्रत्यय लागतात. वरच्या उदाहरणांवरून असे दिसते, की मराठीमध्ये धातू आणि क्रियाविशेषणे विविध प्रकारे विशेषणांची जागा घेतात आणि नामाच्या लिंगाला अनुसरतात. मराठीमध्ये नामांच्या लिंग-वचनाप्रमाणे बदलणाऱ्या शब्दांची संख्या प्रचंड मोठी आहे. हे संख्यात्मक दृष्ट्या सिद्ध करण्यासाठी संस्थात्मक पातळीवर मराठीचे 'कॉर्पस' (corpus) तयार करून संख्याशास्त्रीय माहिती गोळा करणे आवश्यक असले, तरीही मराठीची एकूण व्यवस्थाच नामानुसारी आहे, हे आपल्याला वरील विवेचनावरून दिसून येते. ■

**भ्रूणहत्या / गर्भसमापन**

खरे तर 'भ्रूणहत्या' असे म्हटल्यावर त्यात एक कुकर्माचा दर्प येतो. मनुष्याची हत्या ही मानव-अधिकारांच्या विरोधी आहे. पण मानव-अधिकार जन्माने मिळतात, जन्माआधी नाही हे आपण विसरतो. शिवाय 'भ्रूणहत्या' हा शब्द गर्भसमापन हत्या ठरवतो. त्यामुळे प्रत्येक गर्भसमापनाकडे 'हत्या' या निकषाने पाहिले जाते आणि त्याला विरोध केला जातो. यासाठी 'भ्रूणहत्या' हा शब्दच मुळात वापरात नसायला हवा. आपल्याला जर गर्भलिंग निदानाला विरोध करायचा आहे तर आपण फक्त 'गर्भलिंग निदान नको' असेच म्हणायला हवे आणि हे म्हणताना गर्भसमापनाचा उल्लेख करण्याची काहीच आवश्यकता नाही.

— संपादकीय, पालकनीती : वर्ष १५, अंक २, मे २०१५, पृष्ठ ३



अनुक्रमणिका







पान नं. २वरून...

त्यातील आशयामुळे त्याला ती आपली वाटली. त्यांचा कॉमन मॅन आपलेच प्रतिबिंब वाटला. म्हणूनच आर०के० लक्ष्मण आणि बाळासाहेब ठाकरे हे दोघेही मराठी माणसाचे आवडते व्यंग्यचित्रकार होते, आणि विशेष म्हणजे या दोघांचेही प्रेरणास्थान ब्रिटिश व्यंग्यचित्रकार डेव्हिड लो हेच होते.

आर०के० लक्ष्मण यांना कोणताही विषय वर्ज्य नव्हता. चौफेर निरीक्षणशक्ती आणि संवेदनशीलता ही त्यांची वृत्ती असल्याने त्यांची चित्रे जनमानसाचे प्रतिबिंब ठरली. त्यामुळेच ती लोकप्रियही झाली. मात्र आपल्या समृद्ध लोकशाहीतून आपण अजूनही सर्वसामान्य माणसाचे अन्न, वस्त्र आणि निवारा हे मूलभूत प्रश्न सोडवू शकलो नाही, याचे दु:ख लक्ष्मण यांना नेहमीच वाटत होते. त्यांच्या अनेक व्यंग्यचित्रांचे विषय हेच आहेत. उदाहरणादाखल ''मी उपोषण करणारा नाही हो! मी खरोखरच उपाशी आहे,'' असे म्हणणारा, रस्त्यावर राहणारा गरीब हडकुळा माणूस, किंवा कापडाच्या प्रकाराविषयी जागृत असणाऱ्या मध्यमवर्गीयांचा उपहास करणारा—''माझ्या अंगावरचा कपडा ३०% सुती आहे तर ७०% माझे शरीरच आहे,'' असा दोन भिकाऱ्यांतील संवाद, किंवा ड्रेनेजच्या पाइपमध्ये राहणाऱ्या भिकाऱ्याचे ''मी येथे लपलेलो नाही; मी येथेच राहतो.'' असे पोलिसाला सांगणे; अशा हृदयस्पर्शी व्यंग्यचित्रांमुळे आर०के० लक्ष्मण हे खरोखरच आपले प्रतिनिधी आहेत, असे सामान्य माणसाला न वाटले तरच नवल!

राजकीय व्यंग्यचित्र हे माध्यम हाताळताना आपल्या भवतालाविषयी सूक्ष्म निरीक्षणे नोंदवावी लागतात, संवेदनशीलतेने त्या परिस्थितीवर भाष्य करावे लागते, तरल विनोदबुद्धीचा आविष्कार करावा लागतो आणि हे सारे चित्राच्या अमूर्त भाषेतून सांगावे लागते. अशा क्षमतेमुळे एक व्यंग्यचित्र एका लेखालाही भारी पडू शकते. लेख संपूर्ण वाचल्याखेरीज त्यातील भाष्य कळत नाही; पण व्यंग्यचित्रावर नुसती नजर टाकली तरी त्यातील आशय मनाला भिडतो. राजकीय व्यंग्यचित्रे तर यासाठी खूपच तयारीची असावी लागतात. लक्ष्मण यांनी त्यामध्ये आपली स्वतंत्र वाट तयार केली - जी वाट पुढील काळात अशा अनेक कलाकारांना प्रेरक ठरते आहे.

राजकीय व्यंग्यचित्रांना मिळणाऱ्या लोकप्रियतेमुळे लोकशाही रुजण्यास मदत होते. अभिव्यक्ती स्वातंत्र्याला समाजजीवनात एक महत्त्वाचे स्थान मिळते. उपहास आणि विडंबन ही हत्यारे व्यंग्यचित्रकार वापरतो. या चित्रांचे भय सत्याला नसते, तर ढोंगबाजीला आणि हुकूमशाहीला असते. विडंबनामुळे मौलिक विचार कधीही नष्ट होत नाहीत, उलट ते उजळतात, अशा विचारांवर श्रद्धा असणारा एक प्रामाणिक, सिद्धहस्त चित्रकार आज आपल्यात नाही. त्याला ही भावपूर्ण श्रद्धांजली!

(शब्दांकन - आनन्द काटीकर) ■

# मराठीच्या अभिजाततेतील 'महाभारत' आणि कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर

– मिहिर कृष्ण अर्जुनवाडकर

''रामायण आणि महाभारत या प्राचीन ग्रंथांमध्ये शेकडो शब्द मराठी असल्याचे डॉ० अर्जुनवाडकर यांनी दाखवून दिले आहे.''

अभिजात-मराठी-भाषा-समिती-अहवाल २०१३ (मराठी आवृत्ती), महाराष्ट्र-शासन.

''Dr∘ K∘S∘ Arjunwadkar, a learned scholar of Sanskrit and Marathi has pointed out that the ancient works of literature Mahabharata contain a number of Marathi words.''

अभिजात-मराठी-भाषा-समिती-अहवाल २०१३ (इंग्रजी आवृत्ती), महाराष्ट्र-शासन.

प्रस्तुत-लेख वरच्या दोन अवतरणांच्या संदर्भात आणि ती ज्या अहवालात आहेत, त्याच्या व्यापक संदर्भात आहे. कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकरांच्या 'महाभारतात मराठी' (भाषा आणि जीवन, २२:४, दिवाळी २००४, पृष्ठ ४२-४५) या लेखाचा संदर्भ देऊन मराठीच्या अभिजाततेचा एक पुरावा म्हणून अहवाल वर उद्धृत केलेले विधान करतो. कृष्ण श्रीनिवासांच्या मूळ लेखाच्या पार्श्वभूमीवर हे विधान विपर्यस्त, अतिरंजित आणि दिशाभूल करणारे आहे, हे दाखवणे हा प्रस्तुत लेखाचा एक उद्देश आहे.

शासनाचा हा अहवाल https://marathibhasha.maharashtra.gov.in/Site/Home/Index.aspx इथे 'अंतर्गत संस्था' या शीर्षकाखाली उपलब्ध आहे. कृष्ण श्रीनिवासांचा लेख या अहवालाला परिशिष्ट क्रमांक ४ म्हणून जोडलेला आहे.

प्रस्तुत लेखाचे प्राथमिक टिपण अभिजात मराठी भाषा समितीकडे २०१४ मार्चमध्ये पाठवले होते; त्याची पोचही मिळाली होती. त्यावर समितीत विचारविमर्श होऊन अहवालाच्या प्रकाशित किंवा अप्रकाशित आवृत्तीत काही दुरुस्ती/ बदल केले गेले असले तर तशी माहिती शासनाच्या वर दिलेल्या संकेतस्थळावर आजच्या घटकेला तरी उपलब्ध नाही. समितीला २ मार्च २०१५ला पुन्हा एकदा आठवणही केली, पण निश्चित प्रतिसाद मिळाला नाही. तेव्हा अहवालात बदल केले गेलेले नाहीत, आणि नजीकच्या भविष्यात सुचवलेल्या दुरुस्त्या होण्याची शक्यता दिसत नाही, अशा गृहीतकाखाली प्रस्तुत लेख लिहिला आहे. मूळ टिपणातला बराच भाग इथे यथामूल वापरला आहे.





अनुक्रमणिका

प्रस्तुत लेखात दाखवलेल्या आणि इतर त्रुटींच्या पार्श्वभूमीवर अभ्यासकांनी आणि तज्ज्ञांनी हा अहवाल काळजीपूर्वक तपासावा, आणि मराठीच्या अभिजाततत्वाची मांडणी करायची झाल्यास भाषाभ्यासाच्या शिस्ती आणि तत्त्वं कटाक्षानं पाळून करावी, असं आवाहन भाषाभ्यासकांना करणं, हा प्रस्तुत लेखाचा दुसरा उद्देश आहे. राजकारणाचे रंग बघता येत्या काळात मराठीला अभिजात भाषेचा दर्जा बहाल केला जाईलही, राज्याला केंद्राकडून मोठा निधीही मिळेल, त्याचं पुढे जे व्हायचं ते होईल; पण शंकास्पद मांडणी, सांगोवांगीच्या गोष्टी, आख्यायिका, दंतकथा, आणि अभिनिवेशपूर्ण भावनिक 'पुरावे' हे जर मराठीच्या अभिजाततत्वाचे आधार समजले गेले, तर मराठीच्या वाट्याला द्यूतातल्या द्रौपदीची भूमिका यायची शक्यता आहे.

## कृष्ण श्रीनिवासांच्या या लेखात काय मांडलं आहे?

'महाभारतात मराठी' ह्या लेखात कृष्ण श्रीनिवासांनी संस्कृत महाभारतात (म्हणजे चित्रशाळा प्रत आणि भांडारकर संस्थेची चिकित्सक आवृत्ती यांमध्ये) त्यांना मराठीशी साधर्म्य वाटलेले शब्द, वाक्प्रचार, रचना, रूपकं इत्यादींची एक जंत्री दिली आहे. या लेखाची पार्श्वभूमी त्यांच्याच शब्दांत अशी आहे : ''मराठी ही संस्कृताधारित भाषा असल्यामुळे बहुसंख्य मराठी शब्दांची मुळं संस्कृतात आढळावीत यात नवल नाही. नवल हे की मराठी (क्वचित् हिंदी...) वाक्प्रचार, शब्द, संकल्पना यांच्याशी मिळतेजुळते पुष्कळ वाक्प्रचार, शब्द, अर्थ, संकल्पना, भाषाविकृती इत्यादी सामग्री या ग्रंथात आम्हाला आढळून आली. अन्य संस्कृत ग्रंथ वाचताना सहसा न आढळणारी ही सामग्री महाभारतासारख्या प्राचीन ग्रंथात सापडते याचं मला नवल वाटतं. ती सर्वसाधारण मराठी वाचकांना उद्बोधक, मनोरंजक वाटेल असं वाटतं.''

## कृष्ण श्रीनिवासांच्या या लेखात काय म्हटलेलं नाही?

एक : 'महाभारतात मराठी' हे शीर्षक कृष्ण श्रीनिवासांनी रंजकतेच्या उद्देशानं दिलेलं आहे; संस्कृत महाभारतात मराठी ही भाषा वापरली गेली आहे, किंवा ज्यांना आपण खास मराठी म्हणू असे शब्द त्यात मोठ्या संख्येनं किंवा तुरळक आलेले आहेत, असा कुठलाही दावा करण्याचा या लेखाचा उद्देश किंवा प्रयत्न नाही, हे लेख काळजीपूर्वक वाचणाऱ्या साक्षेपी वाचकाला सहज समजण्यासारखं आहे. वरच्या अवतरणातलं 'मिळतेजुळते' हे कृष्ण श्रीनिवासांचं स्पष्टीकरण फार नेमकं आहे. दोन : जंत्रीतल्या बहुतेक नोंदींचं मराठीशी असलेलं साधर्म्य सहज कळतं; पण क्वचित संदिग्धताही जाणवते - ती दूर करायला कृष्ण श्रीनिवास आता दुर्दैवानं हयात नाहीत. तीन : लेखात नोंदवलेल्या रचना, वाक्प्रचार, शब्द, संकल्पना इत्यादी केवळ मराठीतच सापडतात, अन्य आधुनिक भारतीय भाषांमध्ये दिसत नाहीत, अशा स्वरूपाचा कुठलाही दावा या लेखात केला गेलेला नाही.

### अहवालातली विधानं - विपर्यस्त आणि अतिरंजित

हे लक्षात घेता अहवालातले कृष्ण श्रीनिवासांचा हवाला देऊन केलेले (उद्धृत) विधान विपर्यस्त, अतिरंजित आणि दिशाभूल करणारे आहे हे वेगळं सांगायची गरज आहे असं वाटत नाही. एकाच विधानाच्या मराठी आणि इंग्रजी शब्दांकनांच्या अर्थच्छटांमधला फरकही लक्षणीय आहे.

अशा प्रकारच्या विपर्यासाची स्पष्टीकरणं काय काय असू शकतात? उदाहरणार्थ. (एक): अहवालाचा उद्देश पूर्णत: राजकीय आहे; या निमित्तानं केंद्राकडून मिळणारा निधी. आणि तात्कालिक राजकीय उद्दिष्टं आणि गणितं यांच्या पलीकडे राज्यकर्ते आणि प्रशासक यांना मराठीच्या अभिजातत्वाशी फारसं घेणं-देणं नाही, असं असेल का? (दोन): अभिजातत्वाचा शिक्का आणि निधी बहाल करण्याचा निर्णयही अहवालाच्या दर्जावर किंवा कशा प्रकारे मराठीचं अभिजातत्व सिद्ध केलं आहे यावर अवलंबून नसून केंद्र-राज्य संबंधांवर आणि तत्संबद्ध राजकारणावर आहे, असं असेल का? (तीन): राजकीय अनास्था आणि प्रशासकीय घिसाडघाई यांमुळे समितीतल्या व्यासंगी अभ्यासकांना पुरेसा वेळ दिला जाऊन, त्यांच्या सर्व सूचनांवर काळजीकाट्यानं चर्चा होऊन, त्या सूचनांचा अहवालात अंतर्भाव झालेला असेलच असं नाही, असं असेल का? (चार): ''छोड दो यार, कोण वाचणार आहे? बघू नंतर...'' इतरही अनेक स्पष्टीकरणं असू शकतील.

### गुणाढ्याची बृहत्कथा

सर्व स्पष्टीकरणं गृहीत धरूनही या अहवालातल्या त्रुटी भाषाभ्यासाच्या परिघावरही नसलेल्या (पण भाषा आणि भाषाभ्यास यांबद्दल आपुलकी आणि आस्था असलेल्या) माझ्यासारख्या वाचकालाही बोचतात. वानगीदाखल एक उदाहरण : ''पैशाची भाषेतील गुणाढ्याने लिहिलेल्या 'बृहत्कथा' या ग्रंथात तर अनेक प्रकरणेच मराठीत आहेत.'' (मराठी अहवाल, पृष्ठ १०५). गुणाढ्याची मूळ पैशाची भाषेतली बृहत्कथा महाराष्ट्र शासनाला सापडली आहे का? अवश्य प्रसिद्ध करावी; जगभरचे अभ्यासक दुवा देतील. आता उपलब्ध नसलेल्या मूळ बृहत्कथेचा मराठीशी असलेला धागा जैन परंपरेतल्या माहाराष्ट्री प्राकृतात लिहिलेल्या वसुदेव-हिंडी (हिंडी=भटकंती) या ग्रंथामार्फत असावा, असं अभ्यासकांचं म्हणणं आहे.

बृहत्कथेची पैशाची ही लुप्त झालेली भाषा विंध्यप्रदेशातल्या मुंडा भाषाकुळातली असावी, असा अभ्यासकांचा कयास आहे.

भाषाभ्यासाची पारंपरिक केंद्रं आपली विद्यापीठं आहेत (किंवा असावीत) असं मानलं तर काय दिसतं? देशभरातल्या (राज्य) विद्यापीठांची गेली दोन दशकं तरी चाललेली हेळसांड विद्यापीठांची (अभ्यासक आणि साहित्यिकांचीही?) विद्येशी असलेली-नसलेली





अनुक्रमणिका

बांधिलकी तीही सुटत चालली आहे असं वाटायला लावणारी परिस्थिती, समाजाच्या व शासनाच्या सतत बदलणाऱ्या रास्त किंवा अनाठायी अपेक्षा आणि गरजा, ह्या आणि अशा अडथळ्यांमधून मार्ग काढून विद्यापीठांना मूळ उद्दिष्टांकडे परत वळवणं, विद्याभ्यासाच्या चांगल्या परंपरा पुनरुज्जीवित करणं, वैयक्तिक महत्त्वाकांक्षांच्या पलीकडे जाऊन विद्येचं वातावरण निर्माण करू शकणारी चांगली माणसं आपल्या विद्यापीठांमधे आणि संस्थांमधे येतील आणि टिकतील अशी व्यवस्था निर्माण करणं, आणि या प्रक्रियेत राजकीय हस्तक्षेप नसणं — पण पुरेशी राजकीय आणि सामाजिक इच्छाशक्ती असणं, यांतून भाषाभ्यासामधे कदाचित् नवचैतन्य आणि कस निर्माण होऊ शकेल.

■

दिवाळी २०१४ अंकात सहज नजरेस आलेले दोष :

| पान क्र० | ओळ | चूक | बरोबर |
|---|---|---|---|
| २ | १६ | लेखिा | लेखिका |
| ५ | १५ | -- | 'असे समजले जाते' हा वाक्यांश काढून टाकावा |
| ६ | ३ | वर्णनापर | वर्णनपर |
| १६ | २९ | नाही. | नाही (नंतर पूर्णविराम नको) |
| २८ | १९ | विल्मय | विल्यम |
| २८ | २७ | आपत्तींचा | आपत्तींशी |
| २९ | २० | गर्व | अभिमान |
| ३६ | ३१ | सॉप्टवेयर | सॉफ्टवेअर |
| ४३ | ४ | सिध्द्यर्थ | सिद्ध्यर्थ |
| ४८ | ४ | व्यावसायनिष्ठ | व्यवसायनिष्ठ |
| ४९ | १६ | अभंगरचेनत | अभंगरचनेत |
| ५४ | ६ | पालेमुळे | पाळेमुळे |
| ६१ | १३ | गुलवर्गा | गुलबर्गा |
| ६२ | १६ | कशला | कशाला |
| ६६ | २४ | नॅशनल अर्काइव्हज् (म्हणजे राष्ट्रीय अभिलेखागार) अर्काइव्हज् म्हणतात? | नॅशनल अर्काइव्हज् (म्हणजे राष्ट्रीय अभिलेखागार) म्हणतात? |

# परिभाषा परीक्षणाची आवश्यकता

– केतकी मोडक

### परिभाषा म्हणजे काय?

कोणत्याही भाषेत शब्दांचे सामान्य शब्द आणि पारिभाषिक शब्द असे दोन प्रकार आढळून येतात. कधीकधी एकच शब्द सामान्य भाषेत सामान्य अर्थाने तसेच पारिभाषिक शब्द या अर्थानेही वापरला जातो. पण त्या शब्दाचा पारिभाषिक शब्दामध्ये जेव्हा अंतर्भाव होतो तेव्हा त्याच शब्दाला विशिष्ट संदर्भक्षेत्रात विशिष्ट निश्चितार्थबोधक असा अर्थ प्राप्त झालेला असतो. उदा० 'तुला माझी किंमतच नाही.' असे एखादी व्यक्ती दुसऱ्या व्यक्तीला उद्देशून म्हणते तेव्हा त्यातील 'किंमत' ह्या शब्दाने 'महत्त्व' असा अर्थबोध होतो. त्याच शब्दाचा अर्थशास्त्राच्या संदर्भात वेगळा अर्थबोध होतो.

शब्दांचा वा वाक्यांचा विस्तार टाळून व संक्षेप करून एकच एक निश्चित अर्थ सांगणे हा परिभाषा करण्याचा उद्देश असतो. एखाद्या विशेष ज्ञानाच्या क्षेत्रात निश्चित व एकाच अर्थी प्रयुक्त होणारा व व्याख्येच्या द्वारा व्यक्त होऊ शकणाऱ्या कल्पनेचे ध्वनिरूप प्रतीक असणारा शब्द म्हणजे पारिभाषिक शब्द होय. (प्रशासनिक..) पारिभाषिक शब्दांच्या अर्थाला काटेकोरपणा असतो.

### भाषासंचालनालयाचे कार्य

महाराष्ट्राचा विकास व्हावयाचा तर मराठी भाषेचा ज्ञानभाषा आणि व्यावहारिक भाषा म्हणून वापर वाढावयास हवा म्हणजे पर्यायाने मराठी पारिभाषिक शब्दांचा विकास व्हावयास हवा, ही निकड लक्षात घेऊन महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर, १९६० साली महाराष्ट्र भाषा संचालनालयाची स्थापना झाली. नंतर परिभाषाकोशाचे काम हाती घेण्यात आले. ही पारिभाषिक शब्दनिर्मिती करण्यासाठी संस्कृत, उर्दू, फारसी, इंग्रजी या भाषांचा आधार घेण्यात आला. मराठीतील नामवंत कोशकार, भाषातज्ज्ञ, पत्रकार, प्राध्यापक, समाज-प्रबोधक यांचा समावेश असणारे भाषा-सल्लागार-मंडळ नेमण्यात आले. विविध उपसमित्या तयार करून त्यांच्याद्वारे वाणिज्य, अर्थशास्त्र, कृषिशास्त्र, भाषाविज्ञान इ० विद्याशाखांवर आधारित आजवर एकंदर ४६ परिभाषा-कोशांची निर्मिती करण्यात आलेली आहे. हे मोठेच काम आजवर झालेले आहे यात शंका नाही.

पण आता काळानुरूप त्यातही बदल करण्याची आवश्यकता आहे. त्या सर्व कोशांचे संगणक-समावेशन (डिजीटलीकरण) होणे आवश्यक आहे. परंतु तसा प्रयत्न झालेला

दिसत नाही. हे सारे कोश संगणकावर केवळ वाचण्यासाठी उपलब्ध आहेत, परंतु त्यांचा वापरासाठी, संपादनासाठी उपयोग करता येत नाही. म्हणजेच ते कोश, त्यातील शब्द 'शोधक्षम' (सर्चेबल) नाहीत.

**परिभाषा रुळवण्याची आवश्यकता**

परिभाषा जाणीवपूर्वक घडवलेली असते. ती लोकव्यवहारातून स्वाभाविकपणे उगवलेली नसते. त्यामुळे ती व्यवहारात रुळवण्यासाठी, रुजवण्यासाठी काही विशेष प्रयत्न करावे लागतात. यामध्ये प्रसारमाध्यमे, शासन, शिक्षणक्षेत्रातील व्यक्ती, संशोधक, लेखक, विचारवंत यांची भूमिका मोलाची ठरू शकते.

**परिभाषा परीक्षणाची आवश्यकता**

एका बाजूने हे परिभाषा रुजवण्याचे प्रयत्न चालू असतानाच, दुसरीकडे शासनाने प्रकाशित केलेल्या कोशांच्या परीक्षणाचीही व्यवस्था कार्यान्वित करावयास हवी. ह्या परीक्षणाची आवश्यकता कोणकोणत्या कारणांसाठी आहे ते आता पाहू.

**परिभाषेतील दुर्बोधता**

परिभाषानिर्मिती करताना, त्या संज्ञा सर्वसामान्यांनाही चटकन आकलन होतील अशा असणे गरजेचे असते. त्यासाठी त्यांचे मूळ मराठी असेल असे पाहणे आवश्यक आहे. परिभाषानिर्मितीसाठी संस्कृत भाषेचा आधार घेण्याची रूढ पद्धत आहे; परंतु तिचा वापरही तारतम्याने होणे गरजेचे आहे. अन्यथा परकीय भाषा परवडली; पण मराठी पारिभाषिक शब्द नको असे म्हणण्याचा अनवस्था प्रसंग ओढवतो. उदा० 'डिपॉझिटरी' या शब्दाचा मराठी पारिभाषिक शब्द आहे 'निक्षेपस्थान'! ज्याला संस्कृतची कोणतीही पार्श्वभूमी नाही अशा मराठी माणसाच्या कानावर हा शब्द पडला तर त्याला कोणताच अर्थबोध होणार नाही. त्यापेक्षा 'डिपॉझिट' हा शब्द प्रचलित असल्याने 'डिपॉझिटरी' हा शब्द त्याला अधिक जवळचा वाटणे शक्य आहे. येथे निक्षेप या संस्कृत शब्दाऐवजी मराठी शब्दाला जवळचा असा दुसरा एखादा पारिभाषिक शब्द घडवणे आवश्यक आहे. 'डिपॉझिटरी' या शब्दाला 'धरोहर' हा शब्दही मराठी प्रतिशब्द म्हणून 'कृ०भा० परांजपेकृत शेअर-बाजारातील 'भाग्यरेषा' ह्या पुस्तकात दिलेला आढळला. (ह्या पुस्तकात शेअर बाजाराशी संबंधित, प्रचारात नसलेले असे अनेक पारिभाषिक शब्द रूढ करण्याचा प्रयत्न झालेला आहे.) हा शब्द हिंदीमध्ये अधिक रूढ आहे. पण तोही मराठी भाषकांना आकलन होणे दुर्बोध आहे. मराठीमध्ये गोदाम, कोठार, कोठी, भांडार इ० शब्द साठवणूक करण्याच्या स्थानाचा निर्देश करणारे म्हणून प्रचलित आहेत. यांपैकी एखाद्या उचित किंवा या शब्दांवर आधारित असा एखादा नवीन शब्द घडवणे अधिक उपयुक्त ठरणार नाही का?

असा एक चांगला प्रयत्न 'न्यायव्यवहार कोशा'च्या नवीन आवृत्तीत झाला असल्याचे आढळून येते. यामध्ये परीक्षण करून परिभाषेच्या सुलभीकरणाचा प्रयत्न झालेला आहे,





अनुक्रमणिका

हे या समितीचे अध्यक्ष न्या० चंद्रशेखर धर्माधिकारी यांच्या प्रस्तावनेवरून लक्षात येते.

'मंथन' या लेखसंग्रहामधील 'भाषा-सल्लागार-मंडळाची भूमिका : शासन-व्यवहारातील मराठी' या लेखात भाषा-संचालनालयाने असा दावा केलेला आहे, की तीस हजार शब्दसंख्येच्या शासनव्यवहार-कोशात संस्कृतनिष्ठ व बोजड असे फारतर हजारएक शब्द निघू शकतील. हा दावाही तज्ज्ञांनी तपासून पाहावयास हवा.

### शासनव्यवहार-कोशावरील टीका

शासनव्यवहार कोशावर त्या काळात झालेल्या टीकेमुळेदेखील परत एकदा परिभाषा-परीक्षणाची आवश्यकता आहे हे अधोरेखित व्हावे. डॉ० अशोक केळकर ह्यांनी असा परीक्षणाचा प्रयत्न केलेला दिसतो. त्यांच्या परीक्षणाचा निष्कर्ष त्यांनी नमूद केला आहे. त्यांनी ३०,००० शब्दांपैकी १,००० शब्द तपासले तेव्हा त्यांना आढळले की, सुमारे एक टक्का शब्दांना दुर्बोध आणि सुबोध असे दोन्ही पर्याय देण्यात आले आहेत.

उदा० शासन किंवा सरकार, वरकड खर्च किंवा उपपरिव्यय. तसेच त्यांनी हेही निरीक्षण नोंदवले आहे, की सुमारे तीन टक्के संज्ञांना अधिक चपखल पर्याय शोधणे शक्य आहे. उदा० overseer, inspector अवेक्षक, passed with grace अनुग्रहोत्तीर्ण इ० (मंथन, पा० ४१)

### इतर भाषांतील पारिभाषिक-शब्दांची उसनवारी

इतर भाषांमधील शब्दांची आयात करण्याची आवश्यकता असल्यास त्यांचा विचार, समावेश अवश्य करावा. परंतु ते करत असताना त्यामध्ये तर्कशुद्धता पाळली जाईल हे पाहणे गरजेचे आहे. हिंदी शब्दांची अनाठायी आयात केली तर कसा प्रसंग उद्‌भवतो ते उदाहरणाने स्पष्ट करू. 'अकाउंट' या शब्दाला खाते असा साधा, सोपा व प्रचलित शब्द मराठीत आहे. त्यावरून 'अकाउंट होल्डर'ला खातेधारक हाही चांगला चपखल शब्द उपलब्ध आहे. परंतु तेच 'अकाउंटंट' मात्र एकदम मराठीत 'लेखापाल' होतो, ते का कळत नाही. तोच काही ठिकाणी 'लेखाकार'ही होतो. लेखाकार हा शब्द दूरान्वयानेही 'अकाउंटंट' या शब्दाचे सूचन करणारा वाटत नाही. उलट लेख आणि त्याचा आकार म्हणजे शब्दमर्यादा इ०शी संबंधित म्हणजे लिखाणाशी संबंधित असा वाटतो. त्यामुळे अर्थनिश्चिती होण्याऐवजी उलट अर्थाबाबत बुद्धिभेदच होतो. ('अकाउंट' या शब्दाला हिंदीमध्ये खाते आणि लेखा असे दोन पर्यायवाची शब्द आहेत.) येथे खातेपालक असा किंवा त्यासारखा एखादा दुसरा अधिक योग्य शब्द सुचविता आला नसता का? हिशेबनीस हाही त्याला पर्यायवाची समर्पक शब्द मराठीतच उपलब्ध असताना, लेखापाल का प्रचलित व्हावा ते समजत नाही. 'राष्ट्रीय ऐक्यासाठी मराठी संज्ञा व हिंदी संज्ञा यांच्यात हिंदी संज्ञांशी एकरूपता ठेवण्याचा प्रयत्न करणे' या शासकीय धोरणाचा हा परिणाम असावा असे वाटते.

**मूळ भाषेशी निष्ठा**

मुळात विचार करताना ज्या भाषेत केलेला असतो, त्या भाषेशी (उदाहरणादाखल इंग्रजी) कमालीची एकनिष्ठा राखण्याच्या प्रयत्नातूनही कधीकधी चुकीचे किंवा अनावश्यक पारिभाषिक शब्द तयार होण्याची शक्यता संभवते. जसे टेन मिलियनचे भाषांतर करताना,दहा दशलक्ष हा शब्दप्रयोग कशाला? त्यापेक्षा मराठीत एक कोटी म्हणणे अधिक सुयोग्य आहे. तेव्हा पारिभाषिक शब्द अन्य भाषेतून स्वीकारताना, त्याचे आत्मसातीकरण करताना, मराठी भाषेची मूळ प्रकृती काय आहे ह्याचा विचार होणे आवश्यक आहे. असे अनाठायी स्वीकरण तर कोशांमध्ये झालेले नाही ना हेही तपासावे लागेल.

**परिभाषानिर्मितीचे सततचे कार्य**

परिभाषा एकदाच कधीतरी निर्माण झाली आणि नंतर भाषेची नवशब्दनिर्मितीची प्रसवक्षमता संपली असे होत नाही. भाषा ही जिवंत असल्यामुळे तिच्यात सातत्याने नवनवीन पारिभाषिक संज्ञांची भर पडत असते. या नवीन पारिभाषिक संज्ञांची योग्य ती दखल घेणे यादृष्टीने त्यांचा परिभाषा-कोशात नव्याने समावेश करणे आवश्यक असते. परंतु छापील आवृत्ती प्रकारात त्यांचा लगेचच समावेश करता येणे बरेचदा तांत्रिक व व्यावहारिक कारणांमुळे शक्य होत नाही. ह्यासाठी देखील परिभाषा-कोशांच्या सातत्यपूर्ण परीक्षणाची आवश्यकता असते. 'भाषाविज्ञानकोशा'त हा प्रयत्न करण्यात आला आहे. (जिज्ञासू वाचकांनी भाषाविज्ञानकोशाचे संपादकीय प्रास्ताविक जरूर अभ्यासावे.)

किंवा असेही असू शकते की, परिभाषा कोश निर्मितिकार्यात सहभागी असलेल्या समितीच्याही स्वत:च्या म्हणून काही परिस्थितिजन्य, कालजन्य काही मर्यादा असू शकतात. आणि त्यामुळे तो परिभाषा कोश सर्वसमावेशक बनण्याच्या दृष्टीने त्यात उणेपणा राहून जातो.

मात्र नंतरच्या काळात, बदललेल्या परिस्थितीत पुन:पुन्हा परीक्षण होत राहिले तर ह्या उणेपणावर मात करता येणे शक्य आहे. उदा० योगी श्री अरविंदांनी अतिमानसाचे तत्त्वज्ञान इंग्रजीमधून मांडले आणि त्याचे मराठीत अगदी हुबेहूब भाषांतर करण्याचे मोठे मौलिक काम सेनापती बापटांनी केले आहे. हे भाषांतराचे काम करत असताना, सेनापती बापटांना अनेक पारिभाषिक संज्ञा नव्याने घडवण्याची आवश्यकता भासली असणार हे लक्षात येते. (कारण मुळात इंग्रजीमध्येच अनेक नवीन पारिभाषिक-शब्द श्री अरविंदांनी घडवले आहेत.) अशा शेकडो पारिभाषिक-शब्दांची 'दिव्य जीवन, मराठी संस्कृतीचा पाया, योगसमन्वय, गीतेवरील निबंध' इ० पुस्तकांच्या निमित्ताने मराठीत नव्याने भर पडली आहे. (उदा० अभीप्सा, अधिमानस, अतिमानस इ० हे शब्द पुढील लेखकांनीही वापरल्यामुळे ते मराठीत चांगले रुजले आहेत.) पण त्याची 'तत्त्वज्ञान आणि तर्कशास्त्र परिभाषा-कोश' यात दखल घेतली गेल्याचे दिसत नाही. अर्थात हे उदाहरण फक्त

वानगीदाखल दिले आहे. पण त्यावरून परिभाषा-कोशांच्या सातत्यपूर्ण परीक्षणाची आणि नव्या सुधारित आवृत्त्यांची गरज लक्षात यावी.

वरील विवेचनावरून हे लक्षात यावे, की परिभाषा-कोशात समाविष्ट असणाऱ्या पारिभाषिक-संज्ञांच्या परीक्षणाची आज बदललेल्या काळानुसार पुन्हा एकवार आवश्यकता आहे. काळ बदलतो तशी भाषा बदलते, जुने शब्द कालौघात मागे पडतात. नामशेष होतात. असलेल्या शब्दांना नवीन अर्थ प्राप्त होतात, यासारख्या बाबींमुळे परिभाषा-कोशांचे परीक्षण आणि त्यांचे परिष्करण ही एक सतत चालणारी प्रक्रिया असणे आवश्यक असते.

**कालसुसंगतता**

शासनप्रणीत परिभाषाकोशांमध्ये त्या काळात (त्यांच्या निर्मितीच्या काळी, प्रामुख्याने साठच्या दशकात) रूढ असलेले मराठी शब्दही जसेच्या तसे वापरल्याची काही उदाहरणे पाहावयास मिळतात. उदा० कंपनी अडली, सुतार, चित्रकार, रंगवाला, लोहार, चपराशी इ० यांपैकी उदाहरणादाखल एक शब्द विचारात घेऊ. 'कंपनी ऑर्डर्ली' या शब्दाचा पारिभाषिक-शब्द म्हणून त्या काळात रूढ असणारा, अपभ्रंश म्हणावा असा 'कंपनी अडली' हा शब्द पारिभाषिक शब्द म्हणून स्वीकारण्यात आला आहे. पण एकतर तो समर्पक, अर्थवाही आहे का, आणि आजच्या पिढीला त्याचा तोच अर्थ अभिप्रेत आहे का हे पाहणे गरजेचे आहे. येथे काळाचा संदर्भ आणि त्याबरोबर तो शब्दही मागे पडलेला असल्याने, 'कंपनी अडली' या शब्दप्रयोगातून आजतरी अनर्थकारक वाटावा असा अर्थ प्रतीत होतो. तेव्हा रूढ शब्द पारिभाषिक शब्द म्हणून स्वीकारताना तारतम्याने विचार व्हावा ही गोष्ट आवश्यक वाटते. तीच गोष्ट 'बेंच क्लर्क' या शब्दाची. याला पारिभाषिक संज्ञा आहे 'शिरस्तेदार'. या शब्दातून आज कोणता अर्थबोध होतो? शिरस्तेदार शब्दापेक्षा बेंच क्लर्क हा शब्दच अधिक जवळचा वाटावा अशी स्थिती आहे. तेव्हा काळानुरूप परिभाषेचे ठरावीक कालांतराने परीक्षण होत राहिले पाहिजे हे लक्षात यावे.

**काळाचा झपाटा**

काळ झपाट्याने बदलतो आहे. भ्रमणध्वनी, संकेतस्थळ इ०शी संबंधित माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात, नवीन तंत्रज्ञानात रोज एक नवी आवृत्ती (व्हार्शन) बाहेर पडत आहे. (व्हार्शनला साहित्यसमीक्षा क्षेत्रात, 'पाठ' हा मराठी पारिभाषिक शब्द आहे; परंतु येथे तो योग्य वाटत नाही.) शेअरबाजार, ई-ट्रेडिंग, ई-बँकिंग, ई-कॉमर्स हीदेखील अशीच नवोदित क्षेत्रे आहेत, प्रसारमाध्यमांचा वाढता व्याप हेदेखील असेच एक वेगाने विकसित होत चाललेले क्षेत्र; परंतु या क्षेत्रांतील पारिभाषिक शब्दांची निर्मिती करण्यासाठी आजवर भाषा संचालनालयातर्फे कोणतीही समिती स्थापन झाल्याचे आढळत नाही. किंबहुना २००३नंतर एकाही नव्या परिभाषा-कोशाचे काम हाती घेतल्याचे आढळत नाही.

काळ कोणासाठी थांबत नाही. प्रचंड वेगाने सर्वच क्षेत्रात सध्या होत असलेला बदल, विकास आता तुमच्या भाषेत तो आशय व्यक्त करण्यासाठी शब्द नाहीत म्हणून थांबणार नाही. तुम्ही ती शब्दनिर्मिती करू शकला नाहीत, तर तुमच्या पारिभाषिक-शब्दांची निर्मिती होईपर्यंत ती प्रगती खोळंबून राहू शकणार नाही. परभाषेचा (ज्या भाषेत तो आशय चपखलपणे व्यक्त होतो अशी कोणतीही इतर भाषा) आधार घेतल्यावाचून ती राहणार नाही. इतरत्र सर्वत्र जाणीवपूर्वक मराठी-पारिभाषिक-शब्दांचा वापर करणाऱ्या वर्तमानपत्रात आलेले हे पुढील वाक्य पाहा : 'कंपनी बंद होणार म्हटल्यावर विद्यमान देयक भरण्यासाठी तसेच पोर्टिंग करण्यासाठी आवश्यक असलेला कोड मिळवण्यातही अडचणी येऊ लागल्या.' (यातील पोर्टिंग म्हणजे भ्रमणध्वनीचा क्रमांक तोच ठेवून सेवा बदलण्याची सुविधा.) अर्थात येथे ही बाब इंग्रजीचा सोस म्हणून झालेली नाही, तर कालसुसंगत बदल घडवून घेत, समर्थ मराठी पारिभाषिक पर्याय देण्यात मराठी भाषक कमी पडले म्हणून असा धेडगुजरी वापर करावा लागला आहे हे लक्षात येते. पारिभाषिक-शब्दकोशांच्या नवनिर्माण-कार्याची किती आवश्यकता आहे हे कळण्यासाठी वरील उदाहरण वानगीदाखल पुरेसे व्हावे. आणि ही बाब आताचीच आहे असे समजण्याचे कारण नाही. सायकल व्यवहारात प्रचलित होऊन कित्येक काळ लोटला; पण सायकलशी संबंधित सर्व शब्द घेतलेले इंग्रजीतूनच आहेत तेच आजही वापरावे लागतात. उदा० सीट, बेल, स्पोक, ट्यूब, डायनोमो, ब्रेक, पंक्चर, टायर इ०इ०

वि०दा० सावरकर यांनी कोणते परकीय शब्द राहू द्यावे आणि कोणते टाकावे यासंबंधी काही नियम मांडले आहेत. ते असे,

(१) शब्द, ज्या वस्तू, जे विचार आपल्या भाषेत उपलब्ध होण्यासारखे असतील किंवा ज्या ठिकाणी आपल्याला सुलभतेने प्रतिशब्द निर्माण करणे शक्य आहे, तेथे परकीय भाषेतील शब्द घेण्याचे कारणच नाही.

(२) तसेच जे शब्द, ज्या वस्तू, जे विचारही पूर्वी आपल्या भाषेत नव्हते आणि ज्यांना आपले शब्द सुचवणेच शक्य नाही केवळ त्यासाठी परकीय भाषेतील शब्द घेण्यास प्रत्यवाय नाही. (समग्र सावरकर, खंड ९, पान ४३)

वरील विचार त्या काळात योग्य असतीलही, कारण त्या काळात खुद्द सावरकरांसारखी भाषाप्रेमी मंडळी पारिभाषिक शब्दांची निर्मिती करण्यासाठी आपली शक्ती पणाला लावत होती. पण आजच्या काळात मराठी भाषकांमध्ये स्वभाषेविषयी आलेल्या उदासीनतेचा इतका पगडा आहे की, अशी काही खटपट फारशी होताना दिसत नाही. (काही सन्मान्य अपवाद वगळता) परकीय भाषेतील शब्द आहेत तसे उचलण्याकडे कल मोठ्या प्रमाणात वाढला आहे, आळस वाढला आहे. किंवा काळाचा झपाटा इतका आहे, की नवीन शब्दांची

घडण करण्यासाठी थांबण्यास वेळ नाही असे म्हणू या हवे तर; पण वस्तुस्थिती अशी आहे खरी. उदा० स्पोक यासाठी आरा हा पारिभाषिक एकार्थबोधक शब्द उपलब्ध आहे. पण तो वापरात नाही.

### संसाधनांची उपलब्धता

काळ बदलल्याचाच आणखी एक सकारात्मक परिणाम असा, की त्यामुळे अधिक व्यापक, अधिक पायाभूत असे माहितीस्रोत आज माहितीमहाजालाच्या माध्यमातून उपलब्ध होत आहेत. एकेकाळी अशी कोशनिर्मिती करण्याचे काम फार जिकिरीचे, वेळखाऊ होते. साधनांची चणचण असताना केलेले काम आणि मुबलक संसाधने हाताशी उपलब्ध असताना केलेले काम ह्यात तफावत पडणारच. तेव्हा आता अधिक संसाधने उपलब्ध झाल्याच्या काळात कोशांमध्ये, कोशनिर्मिती व कोशपरीक्षणाच्या कामात कालसुसंगत बदल घडवण्याची आवश्यकता आहे.

### व्यावहारिक उपयोजन

एकदा शब्द कोशनिविष्ट झाले, की ते म्हणजे जणू काळ्या दगडावरची रेघ, अशी समजूत कोशकारांचीदेखील नव्हती हे पुढील दाखल्यावरून लक्षात येते. १९७९-८० साली परिभाषानिर्मितीचे काम नव्याने सुरू करण्यात आले होते. त्याबद्दल माजी भाषासंचालक श्री० न०ब० पाटील म्हणतात, ''...वापराच्या निकषावर ही परिभाषा अखेरीस घासून पाहावयास हवी असते. त्या दृष्टीने तयार झालेले वा होत असलेले हे पारिभाषिक शब्द यापुढे अजिबात बदलता येणार नाहीत असे नाही.'' (मंथन, पृष्ठ ७६) येथेही परिभाषा व्यावहारिक उपयोगाच्या निकषावर तपासण्याची पर्यायाने परिभाषा-कोशांच्या परीक्षणाची गरज व्यक्त केलेली आहे.

### परिभाषेच्या प्रमाणीकरणाची आवश्यकता

office = दफ्तर, court = कचहरी

ऑफिस या शब्दाला मराठीमध्ये 'कार्यालय' आणि 'कचेरी' हे दोन शब्द प्रचलित आहेत. 'कार्यालय' हा शब्द सगळीकडे वापरला जातो खरा; पण 'कार्यालय' या शब्दामध्ये मंगल कार्यालय हा अर्थही ध्वनित होतो. आणि मग अर्थाचा नेमकेपणा, 'एकार्थता' या कसोटीवर कार्यालय हा शब्द टिकत नाही. त्यापेक्षा कचेरी या शब्दाला फक्त ऑफिस हाच अर्थ आहे. तेव्हा तो अधिक योग्य पर्याय म्हणून वापरात आणण्याची आवश्यकता आहे. अर्थात अधिक योग्य पर्याय उपलब्ध असतानाही, काहीसा संभ्रम निर्माण करणारा 'कार्यालय'सारखा शब्द वापरण्यामागे नेमकी कोणती मानसिकता असते ह्याचाही तपशिलात शोध घेण्याची आवश्यकता आहे. ती मानसिकता लक्षात आल्यास, त्यामागील कारण नेमके स्पष्ट झाल्यास परिभाषा रुळवण्यासाठी त्याचा उपयोग होईल.

दफ्तर





अनुक्रमणिका

**सर्व संस्कृतोद्‌भव भाषांमध्ये पारिभाषिक शब्दांची समानता नको का?**

प्रा० जयंत नारळीकर म्हणतात, ''संस्कृतवर आधारलेली पारिभाषिक शब्दावली निदान संस्कृतपासून उगम पावलेल्या सर्व भारतीय भाषांत तरी समान असणे योग्य नाही का? वस्तुस्थिती मात्र वेगळी आहे. उदाहरणार्थ हिंदी आणि मराठीच पाहा. एकाच इंग्रजी शब्दासाठी संस्कृतवर आधारलेले वेगळे पारिभाषिक शब्द अनेकदा सापडतील.'' (मंथन, पृष्ठ २६) उदा० 'मायक्रोस्कोप' या इंग्रजी शब्दाला विविध भाषांमध्ये विविध पारिभाषिक शब्द आहेत. आणि ते सर्व संस्कृतोद्‌भव असूनदेखील समान नाहीत. उदा० ओडिया भाषेत अणुविक्षणा, मराठीत व गुजराती भाषेत सूक्ष्मदर्शक यंत्र, हिंदीत अणुवीक्ष, सूक्ष्मदर्शी, दक्षिणेतील भाषांमध्ये सूक्ष्मदर्शनम्, सूक्ष्मदर्शिनी इ० पारिभाषिक शब्द आहेत. तेव्हा आता संगणक व महाजालाच्या उपलब्धतेमुळे असा विविध भाषांतर्गत अभ्यास करून अधिक अचूक व मूळ शब्दाशी, त्याच्या अर्थछटेशी तंतोतंत साधर्म्य राखेल असा एक शब्द निवडणे आणि तो सर्व भाषांमध्ये रूढ करण्याचा प्रयत्न करणे हेही शक्य आहे. आवश्यकता आहे ती इच्छाशक्तीची!

**परिभाषेमध्ये बोलीभाषेचा समावेश**

बदललेल्या परिस्थितीत अठरापगड जातीजमातींचे आणि विविध प्रांतांचे लेखक आपापल्या बोलीभाषेतून साहित्यनिर्मिती करताना दिसतात. आणि अर्थातच ही स्पृहणीय स्थिती आहे. साहजिकच बोलीभाषेतील शब्दांचा परिभाषेत समावेश करावा का हा प्रश्न उपस्थित होतो. प्रा० भालचंद्र नेमाडे यांच्या मते, परिभाषेत बोलीचा दुराग्रह असता कामा नये. (मंथन, पृष्ठ ४९) बोलीचा 'दुराग्रह' असता कामा नये हे योग्यच आहे; परंतु जर एखाद्या इंग्रजी संज्ञेला प्रमाण-मराठीमध्ये अचूक शब्द सापडत नसेल आणि तो बोलीभाषेमध्ये असेल तर अशा अपवादात्मक परिस्थितीत, त्या शब्दाची निवड परिभाषा म्हणून करण्यास हरकत का असावी? काही शब्द त्या त्या बोलीभाषेत अधिक प्रचलित असतात आणि ते स्पष्टार्थप्रतिपादक असतात, त्यांचा समावेश परिभाषेत व्हावयास हरकत नसावी. तेथे उगीचच संस्कृतचाही 'दुराग्रह' बाळगण्याची गरज नाही. उदा० वरताळा (वरतवळा, वरतावळा) हा शब्द 'थोडे अधिकचे' या अर्थाने मुद्रण व्यवसायात वापरला जातो. सरप्लस या शब्दासाठी अतिरिक्त, अधिशेष, आधिक्य, वाढावा, शिल्लक इ० प्रतिशब्द वापरलेले आढळतात. दुसरे उदा० 'साकव' या शब्दाचे. साकव हा शब्द कोकणातील बांबूच्या छोट्या पुलांसाठी वापरला जातो. हा शब्द ज्या प्रकारच्या पुलाला वापरला जातो तेथे साकव हाच शब्द चपखल आहे, तेथे पारिभाषिक-कोशातील पूल किंवा सेतू हे शब्द अर्थवाहक ठरत नाहीत. असे शब्द वेचून त्यांचा समावेश पारिभाषिक-कोशात करावयास हवा. अशा रीतीने मराठी ही अधिक अचूक, अधिक अर्थवाही, अधिक स्पष्टार्थसंपन्न होईल.

### ज्ञानाचे विशेषीकरण

बोलीभाषांच्या कोशातील शब्दांच्या परिभाषेतील समावेशनाबाबत आणखीही एक मुद्दा विचारात घेण्याची गरज आहे. वनवासी लोकांमध्ये वन्यजीवन जगत असताना परिसर-विशिष्ट अशा निरीक्षणातून वन्यजीव, वनस्पती इ०संबंधी अत्यधिक प्रावीण्य निर्माण झालेले असू शकते. आणि या प्रावीण्याचा परिणाम म्हणून त्या त्या बोली भाषकांना, ते निरीक्षण अचूक शब्दांत व्यक्त करण्याच्या निकडीतून नवीन शब्दांचा वापर करण्याची आवश्यकता भासलेली असते. आणि परिणामत: अशा शब्दांचा त्या त्या बोलीभाषेत सहज समावेश झालेला असतो. त्यांचा समावेश संबंधित परिभाषा-कोशात व्हावयास नको का? ज्येष्ठ अभ्यासक श्री० मारुती चितमपल्ली यांच्या लेखनात असे कितीतरी शब्द सहजतेने येऊन जातात. उदा० मोरनाची, चकवाचांदण इ०

### विविध क्षेत्रांतील परिभाषांच्या एकत्रीकरणाची गरज

विविध अभ्यासशाखांमध्ये विविध पारिभाषिक शब्दांची निर्मिती झालेली आहे. या सर्वांचे ४६ कोश प्रकाशितही झालेले आहेत. या साऱ्या कोशांचा एकत्रित विचार करून भाषिक एकरूपता आणण्याचीही आवश्यकता आहे. अर्थात यासाठीदेखील परिभाषांच्या परीक्षणाची आवश्यकता आहे. उदा० इमिडिअट या एकाच शब्दासाठी विविध विद्याशाखीय कोशांत निकट, तत्काळ, प्रत्यक्ष, अनंतर, अव्यवहित, निकटवर्ती, तात्कालिक, अविलंब, आसन्न, सन्निकट असे विविध पारिभाषिक शब्द वापरलेले आढळतात. या साऱ्यांमध्ये एकवाक्यता आणणे शक्य होईल का हे तपासणेही आवश्यक आहे. अर्थात ही बाब संगणकनिविष्ट, शोधण्याजोग्या कोशांमुळे सहजसाध्य होऊ शकेल हे लक्षात यावे.

### कोशांच्या नूतनीकरणाची, अद्ययावतीकरणाची गरज

वरील सर्वच कारणांसाठी संगणकाचे साहाय्य किती उपयुक्त ठरू शकेल हे लक्षात येते. किंबहुना आंतरविद्याशाखीय परिभाषांचा अभ्यास, बोलीभाषांचा अभ्यास, बहुभाषिक अभ्यास या साऱ्या अभ्यासासाठी संगणकासारखा दुसरा प्रभावी पर्याय नाही. पूर्वकाळात कोशनिर्मितीच्या कामात ज्या परिस्थितिजन्य, कालजन्य मर्यादा होत्या, त्या बहुतांश सर्व मर्यादांवर संगणकाच्या साहाय्याने मात करणे आज शक्य आहे. संगणकाच्या साहाय्यामुळे, आंतरजाल (इंटरनेट)च्या साहाय्यामुळे भौगोलिकदृष्ट्या व्यक्ती कोठे आहे ह्याने फारसा फरक पडत नाही. जगभरात जेथे म्हणून मराठी भाषक आहेत ते सर्वजण आपापल्या ठिकाणी राहूनदेखील आंतरजालाच्या माध्यमातून या प्रकल्पात सहभागी होऊ शकतात. बहुभाषिक पारिभाषिक अभ्यास कसा करता येऊ शकतो ह्याचे एक उत्तम उदाहरण म्हणजे dictionary.sriaurobindoandmother.com हे संकेतस्थळ (वेबसाइट) होय. योगी श्री अरविंदांनी उपयोगात आणलेल्या पारिभाषिक संज्ञांची विविध भाषांतील (उदा० संस्कृत,

मराठी, हिंदी, गुजराती, बंगाली, कानडी, ओरिया, तामीळ, फ्रेंच, जर्मन, रशियन, स्पॅनिश इ०) पारिभाषिक संज्ञांच्या पर्यायांची एकत्रित नोंद येथे उपलब्ध आहे.

**उपयुक्त संकेतस्थळे (वेबसाइट्स)**

अशा प्रकारच्या कामाची आवश्यकता ज्यांना जाणवली आहे अशा व्यक्ती, संस्था, कंपन्या यांनी स्फुट प्रयत्न करायला सुरुवात केलेली आहे असे दिसून येते.

आंतरभाषा अभ्यासासाठी उपयुक्त अशी काही संकेतस्थळे पुढीलप्रमाणे - www.whatiscalled.com या संकेतस्थळावर सुमारे ८३ भाषांमधील शब्दांचा अभ्यास करण्याची सामायिक सुविधा उपलब्ध आहे. 'मराठी शब्दबंध' या संकेत-स्थळाचाही उपयोग होऊ शकतो. (www.cfilt.iitb.ac.in/wordnet). असा व्यावसायिक प्रयत्न मायक्रोसॉफ्टने bhashaindia.com या माध्यमातून केलेला दिसून येतो. या संकेतस्थळावर community glossary या प्रकल्पांतर्गत अशा परिभाषा-निर्मितीचे काम हाती घेतल्याचे दिसून येते. मायक्रोसॉफ्टच्या लँग्वेज पोर्टलवर माहिती तंत्रज्ञान (आय०टी०) क्षेत्राशी संबंधित पारिभाषिक संज्ञांच्या अभ्यासाची सोय उपलब्ध आहे. http://www.microsoft.com/Language/en-US/Search.aspx येथे १०० भाषांमधील शब्द शोधण्याची सोय आहे. त्यात मराठीचाही समावेश आहे. www.khandbahale.org या संकेतस्थळावर २३ भारतीय भाषांमधील शोधक्षम शब्दकोश उपलब्ध आहेत. त्यात नव्याने भर घालण्याचीही वाचकांना सोय उपलब्ध आहे.

प्रामुख्याने इंग्रजीतून मराठीत पारिभाषिक शब्दांचा अभ्यास करण्यासाठी उपयुक्त संकेतस्थळे पुढीलप्रमाणे (१) marathibhasha.org, (२) mr.wiktionary.org, विक्शनरी हा मराठी विकिपीडियाचा प्रकल्प असल्याने तो खुल्या स्रोतातील (ओपनसोर्स) प्रकल्प आहे. त्याची विशेष उपयुक्तता त्यातील 'शब्दसुयोग्यता चर्चा/ वाद' या घटकामुळे आहे. येथे एखादा पारिभाषिक शब्द सुयोग्य आहे किंवा कसे याविषयी चर्चा करण्याची संधी उपलब्ध आहे. (३) मराठी-भाषा-संगणनाचे उत्कृष्टता केंद्र - coe.maharashtra.gov.in येथेही परिभाषा-कोशांसंबधित कार्य चालू असल्याचे आढळते. यामध्ये संकेतस्थळ, मोबाईल इ० नवोदित क्षेत्रांशी संबंधित परिभाषानिर्मितीचे काम सुरू झाल्याचे पूर्वी सांगितले आहेच. या संकेतस्थळावर शासनप्रकाशित ४६ कोशही 'उतरवण्यायोग्य' (डाउनलोडेबल) स्वरूपात उपलब्ध आहेत.

**परिभाषा परीक्षण कार्याची व्यवस्था**

वरील सर्व विवेचनावरून लक्षात येईल, की पूर्वीच्या तुलनेत संगणकाच्या साहाय्याने हे काम अधिक सुकर, अधिक सर्वसमावेशक होणे शक्य आहे. आधुनिक काळानुसार, सहभाग मोठ्या प्रमाणात मिळवण्यासाठी इंटरनेट व विकिपीडियासारख्या सामायिक साधनांचा उपयोग करून घ्यावा. परिभाषा-कोशनिर्मितीचे कार्य प्रत्येक तज्ज्ञ व्यक्ती

आपापल्या जागी बसूनदेखील करू शकेल. सर्वांच्या सोयीच्या वेळा ठरवून एकत्र ठरावीक ठिकाणी भेटणे ही आवश्यकता संगणकाधारित कामामध्ये संपून गेल्याने काम अधिक वेगवान, सोयीस्कर होणे शक्य आहे.

अशा पद्धतीने काम करत असताना, प्रत्येक शब्दावर व्यापक मंथन घडवून आणता येईल. हा प्रयोग करत असताना, परिभाषा-कोशनिर्मितीच्या कामामध्ये जास्तीत जास्त बोलीभाषांचे तज्ज्ञही सहभागी होतील हे पाहणे उपयुक्त ठरेल.

अशा रीतीने प्रत्येक शब्दावर व्यापक मंथन झाले, की बहुमताच्या, शक्यतो एकमताच्या आधारावर तो शब्द पारिभाषिक संज्ञा म्हणून घोषित करावा. एकदा असे शिक्कामोर्तब झाल्यानंतर तो व्यवहारात प्रचलित करण्यासाठी सर्व ते उपाय करावे. त्याला पर्यायी चुकीचे पारिभाषिक शब्द व्यवहारातून हद्दपार होतील असे पाहावे.

सारांश, मराठीत पारिभाषिक शब्दांबाबत पुढील चार पातळ्यांवर काम होण्याची गरज आहे.

(१) परीक्षण : उपलब्ध पारिभाषिक कोशांतील शब्दांचे परीक्षण.

(२) रुजवण : पारिभाषिक कोशांतील अचूक शब्दांचा वापर व्यवहारात व्हावा म्हणून ते लेखनात, बोलण्यात, व्यवहारात रुळविण्याची गरज.

(३) परिष्करण : परिभाषा-कोशात समाविष्ट असलेल्या पण स्पष्टार्थबोधक नसलेल्या शब्दांचा पुनर्विचार व परिष्करण. उदा० व्हार्शन, कोड, रिमोट कंट्रोल इ०

(४) नवनिर्माण : आज उपलब्ध नसलेल्या पण आवश्यकता असणाऱ्या शब्दांची नव्याने घडण. उदा० पोर्टिंग, प्रोमोज, कॅरीबॅग इ०

नव्या दमाच्या लेखकांनी, भाषाप्रेमींनी, भाषातज्ज्ञांनी, शासकांनी आपापल्या परीने या प्रयत्नांमध्ये मन:पूर्वक सहभागी होणे गरजेचे आहे. अशा प्रयत्नांतून मराठी भाषा ही ज्ञानभाषा बनण्याच्या दृष्टीने, अधिकाधिक परिपूर्ण होणे शक्य होईल.

**संदर्भ :**


( १ ) 'मंथन', राजभाषा वर्षातील वैचारिक लेखांचे संकलन, भाषा संचालनालय प्रकाशन, १९८३.

( २ ) 'प्रशासनिक परिभाषेचा विकास', शासन-व्यवहारात मराठी, भाषा संचालनालय प्रकाशन.

( ३ ) 'परिभाषा', मराठी विश्वकोश, लक्ष्मणशास्त्री जोशी, खंड ९.

( ४ ) http://mr.wikipedia.org/wiki/paribhashikshabdavali

( ५ ) 'भाषाशुद्धि', स्वातंत्र्यवीर सावरकर.

( ६ ) 'समग्र सावरकर', खंड ९.


■

# शब्दकोश प्रकल्प : इयत्ता नववी

– जयश्री काटीकर

अक्षरनंदन शाळेतल्या इ० नववीच्या मुलांचा (मुली आणि मुलगे) 'शब्दकोश प्रकल्प' घेतला. वर्गातल्या अध्ययन-अध्यापन-प्रक्रियेपेक्षा अशा प्रकल्प/उपक्रमातून खरं शिक्षण होत असतं हे जितकं खरं, तितकंच शिक्षकालाही आपलं ज्ञान/ आपलं अध्यापन/ आपली अध्यापनाची दिशा तपासण्याची संधी यांतून मिळत असते. उपक्रमांतून मुलं जितकी जास्त अभिव्यक्त होत असतात तितकी परीक्षातंत्रातून क्वचितच! विशेषत: भाषाविषयक प्रकल्पातून तर मुलांबरोबर शिक्षकालाही मोठं होण्याची संधी मिळत असते. या शब्दकोश प्रकल्पातूनही मुलं भाषेकडे/ शब्दकोशाकडे कशी पाहतात, शब्दकोश कसा आणि कुठल्या पातळीवर समजून घेऊ शकतात; शब्द, शब्दकोशातले वेगवेगळे अर्थ, शब्दांचे घटक याचा अन्वयार्थ ते कसा लावतात, हे समजून घेणं हा माझ्यासाठी विलक्षण अनुभव होता. तो अनुभव मांडण्यासाठीच हा लेखप्रपंच.

**शब्दकोश प्रकल्पाचा उद्देश :**

(१) शब्दकोश हाताळण्याची, पाहण्याची सवय व्हावी. (२) शब्द आणि त्याचा अर्थ एवढ्यावरच न थांबता शब्दकोशातील इतर घटकांचीही ओळख व्हावी. वेगवेगळे शब्द चाळताना, शोधताना मराठीतील शब्दभांडार मुलांच्या दृष्टीस पडावे. त्यांचा शब्दसंग्रह वाढावा. (३) मराठीची चौदाखडी परत एकदा गिरवावी, ती पक्की व्हावी. (४) दोघांनी मिळून प्रकल्प करायचा असल्याने शब्दांबद्दल (शब्दांची निवड, अर्थ, संदर्भ इ०) त्यांच्यात जोरदार चर्चा व्हावी. (५) शब्दकोशाची शिस्त, आवाका याची कल्पना यावी. त्याची जाणीव व्हावी.

**पार्श्वभूमी :**

इ० नववीच्या अभ्यासक्रमात सतराव्या शतकातील रामचंद्रपंत अमात्य यांचा 'प्रधान' नावाचा पाठ आहे. या पाठातील एका परिच्छेदात (सुमारे १५०-२०० शब्द) प्रधानाची निवड कशी करावी, त्याच्या अंगी कोणते गुण असावेत, याविषयींचे विवेचन आहे. प्रकल्प करण्यासाठी या एकाच परिच्छेदाची निवड आम्ही निश्चित केली. या परिच्छेदातील अवघड/ तुमच्या पसंतीचे ४०/५० शब्द निवडून त्यांचा शब्दकोश बनवायचाय, हे मुलांना सांगितलं. सुरुवातीला मुलांना हा प्रकल्प अगदीच सोपा वाटला. इकडे (शब्दकोशात) बघून तिकडे उतरवायचे... इतका सोपा...

**शब्दकोश प्रकल्पाचे टप्पे :**

- निवडलेला परिच्छेद, त्यातील शब्द, त्यांचा अर्थ याबद्दल मुलांशी सविस्तर बोलणं केलं. (हा परिच्छेद शिकण्यासाठी/ समजून घेण्यासाठी आम्हाला ४ तासिका लागल्या.)
- पाठाची प्रस्तावना झाल्यावर त्या परिच्छेदाबद्दल मुलांशी बोलणं केलं. परिच्छेदाच्या सुरुवातीलाच प्रधानाचे १२-१५ गुण एका ओळीत सांगितले आहेत. (उदा० कृतकर्मे, कार्याकार्यविचक्षण, नियोजितकार्यधुरंधर, स्फुटवक्ते, दैवतैकनिष्ठ इ०) त्या शब्दांचा अर्थ मुलांना शब्दकोशातून शोधून यायला सांगितलं. काही शब्दांचे अर्थ शब्दकोशात मुलांना मिळाले नाहीत. पण त्यानिमित्ताने शब्दकोशाची मांडणी मुलांच्या नजरेखालून गेली.
- नंतरच्या तासाला शब्दकोशात काय काय असतं, शब्दकोशाचे किती भाग असतात याबद्दल चर्चा केली. बऱ्याच गोष्टी पुढे आल्या. सुरुवातीला संक्षिप्त रूपं, शेवटी परिशिष्ट अशी शब्दकोशाची मांडणी, शब्दांचे घटक इ०बद्दल मुलांचं निरीक्षण चांगलं होतं.
- मुलांच्या निरीक्षणानुसार शब्दकोश प्रकल्पात प्रस्तावना, शब्दार्थ आणि परिशिष्ट असे तीन भाग करायचे ठरले. शब्दार्थ लिहिताना शब्दाची जात, लिंग, मूळ भाषा, वेगवेगळे अर्थ, परिच्छेदातील त्या शब्दाचा संदर्भाने योग्य अर्थ इ० घटक अनिवार्य केले. शब्दाचा समानार्थी, विरुद्धार्थी शब्द, वाक्यात उपयोग इ० घटक ऐच्छिक ठेवले.
- ॲ आणि ऑ या स्वरांबद्दलही या निमित्तानं बोलणं केलं.
- शब्दकोशाची मांडणी, पानाचा लेआऊट याबद्दलही बोलणं केलं. एका पानावर चार-सहा शब्दच घ्यायचे ठरले.
- शब्द अकारविल्ह्यांप्रमाणे लावणं, हे तर क्रमप्राप्तच होतं.
- दोघांच्या गटांनी मिळून प्रकल्प करायचा होता.
- मुलांना चार-पाच शब्दकोश शाळेत उपलब्ध करून दिले. शाळेच्या वेळापत्रकातील दोन तासिका (सहा-आठ दिवसांच्या अंतराने) प्रकल्पासाठी मुलांना दिल्या. उर्वरित काम घरी करायचे होते.
- शब्दकोश करतानाच्या 'कार्ड पद्धती'विषयीही बोलणे केले. पाठकोऱ्या कागदांचा यासाठी कसा उपयोग करता येईल हेही सांगितले.
- प्रकल्पासाठी १०-१५ दिवसांची मुदत होती. साधारण कामाचे टप्पे काय/कसे असावेत याबद्दलही चर्चा झाली. (जसे - शब्द निवडून ते नक्की करणं, शब्दाच्या घटकांचा क्रम निश्चित करणं, शब्दांच्या शब्दचिठ्ठ्या (कार्ड) करणं, शब्दकोशातून अर्थ, इतर घटक याची नोंद क्रमवार चिठ्ठ्यांवर करणं, अकारविल्हेप्रमाणे चिठ्ठ्या लावून घेणं, प्रत्यक्ष शब्दकोश तयार करणं इ०)

**प्रत्यक्ष शब्दकोश प्रकल्पाबद्दलची काही निरीक्षणे :**

**(१) मुखपृष्ठ :** मुलांनी स्वत:च्या नावाचा लेखक म्हणून उल्लेख न करता संपादक म्हणून उल्लेख केला होता. मुखपृष्ठं आकर्षक, समजून-उमजून केली होती. '२१व्या शतकातील सर्वांत गाजलेला मोर-नातू शब्दकोश', 'आम्हाला आवडलेल्या शब्दांचा कोश' इ० उल्लेख मुखपृष्ठावर होते.

**(२) प्रस्तावना :** सतराव्या शतकातील भाषा, तिच्याबद्दलची मतं, शब्दकोश म्हणजे काय, प्रकल्प करताना आलेल्या अडचणी इ०बद्दल मुलांनी मोकळेपणाने मतं मांडली होती. त्यातली ही काही बोलकी, नमुन्यादाखलची मुलांची मतं...

- **भाषेबद्दलची मुलांची मतं :** (१) सतराव्या शतकातील भाषेला मुलांनी 'जुनी' भाषा असं संबोधलं आहे. (२) ...ही भाषा अवघड नाही पण वेगळी आहे. (३) ...काही शब्द कालबाह्य झाले आहेत तर काहींचा अर्थ काळानुसार बदलला आहे. (४) ...या भाषेतलं एक वाक्य कळेल तर शपथ, सगळेच बाउन्सर... (५) ...अर्थच काय पण शब्दांचे उच्चारही नीट जमत नव्हते. आपलं मराठी चांगलं या अभिमानाला पोचे पडत होते.

- **शब्दकोशाबद्दलची मुलांची मतं :** शब्दकोश कशासाठी, त्याची गरज काय याबद्दलची मतं काहींनी विचार करून व्यवस्थित मांडली आहेत. (१) शब्दांना मर्यादा नसतात, शब्द हे बांधीलही नसतात, पण यातल्याच काही शब्दांना बांधून जिथे एकत्रित ठेवले जाते त्याला शब्दकोश म्हणतात. (२) शब्दकोश म्हणजे गतकालीन व विद्यमान व्यक्तींच्या विचारांची तिजोरी होय. (३) शब्दकोश आणि व्याकरण हे भाषेचे दोन डोळे आहेत. (४) शब्दकोश म्हणजे साठा. (शरीरातील पंचकोश आणि शब्दकोश याकडेही मुलांच्या एका गटाने लक्ष वेधलं आहे.)

- **मुलांच्या काही इतर नोंदी :** (१) बाराखडीच्या ऐवजी मराठीत आता चौदाखडी आहे, हे लक्षात घेऊन अनेकांनी मांडणी केली होती. (२) मराठी वर्णमाला पाठ नसल्याने प्रकल्पात मोठा अडसर निर्माण झाल्याची कबुली अनेकांनी दिली होती. (३) शब्द सापडत नसताना होणारी तळमळ आणि सापडल्यावर मिळणारी शांती याचा अनुभव अतुलनीय होता, असं मत काहींनी नोंदवलं आहे. (४) संधिविग्रह करून शब्द-अर्थ शोधावे लागत असल्याने खूप वेळ लागत होता. वाटलं होतं तेवढं हे काम सोपं नसल्याची कबुलीही काहींनी दिली. (५) पाच-सात पानांचा शब्दकोश करायला/ लिहायला दोन तास तर १,००० शब्दांचा शब्दकोश करायला किती वेळ लागत असेल? असाही विचार मुलं करताना दिसली.

३. शब्द

शब्द हा कोणत्याही शब्दकोशातला महत्त्वाचा भाग. शब्द आणि त्याच्या इतर घटकांच्या नोंदी (शब्दाची मूळ भाषा, शब्दाची जात, लिंग, अर्थ, संदर्भाने योग्य अर्थ इ०) मुलांनी व्यवस्थित केल्या आहेत. त्याविषयी थोडेसे...

- शब्द कोणत्या भाषेतून आले, त्याची मांडणी व्यवस्थित.
- शब्दाची जातही बऱ्यापैकी बरोबर लिहिली आहे.
- मात्र काही जणांनी विशेषणांच्या बाबतीत लिंगविचार लिहिताना गोंधळ केला आहे.

| | | |
|---|---|---|
| उदा० : | **उद्योगशील** | - वि० पुल्लिंगी, स्त्रीलिंगी |
| | **अहिंसक** | - वि० पुल्लिंगी, स्त्रीलिंगी |
| | **थोर** | - वि० पुल्लिंगी |
| | **पापभीरू** | - वि० पुल्लिंगी |

(शब्दांच्या जाती मुलं साधारण पाचवीपासून शिकतात. नववीत यावरच्या प्रश्नांची काठीण्य पातळी वाढवण्यासाठी परिच्छेदातल्या प्रत्येक शब्दाची जात लिहा, असेही प्रश्न मुलांना दिले; पण काही अपवाद वगळता विशेषणांचा लिंगविचार हा विशेष्यांच्या बाबतीत करावा लागतो, हे मुलांपर्यंत पोचवायचं राहूनच गेलं आहे, हे लक्षात आलं.)

- प्रधान पाठ समजून घेऊन पाठाच्या संदर्भात शब्दांचा काय अर्थ जाणवला तो लिहायचा होता. वेगवेगळ्या प्रकल्पातून अर्थाचा किंचितसा फरक जाणवत होता. प्रत्येक मुलाचं वेगळं व्यक्तिमत्त्व असतं, त्याप्रमाणे त्याने पाठ कसा समजून घेतलाय ते त्याने लावलेल्या अर्थावरून कळले.

उदा० :

**स्फुटवक्ता** - मितभाषी, योग्य तेवढे बोलणारा, आपले बोलणे थोडक्यात पण स्पष्टपणे मांडणारा, विविध भाषा जाणून संवाद साधणारा, कमी शब्दांत आपले म्हणणे पटवून देणारा

**कार्याकार्यविचक्षण** - कार्य आणि अकार्य जाणणारा, प्रत्येक काम बारकाईने करणारा, कामाचा उपयोग, उद्दिष्ट जाणणारा चतुर माणूस

**स्वामीसेवकभाव** - राजाप्रती असणारी सेवकाची चित्तवृत्ती
राजाप्रती असणारे सेवकाचे मन/अंतःकरण
धनी/मालक यांचे सेवन करण्याचे भान असणारा
राजाशी एकनिष्ठ राहण्याची वृत्ती
मालकाची निष्ठेने सेवा करणारा
मालकाने नोकरावर केलेली भक्ती

**नियोजितकार्यधुरंधर** - दिलेले काम पार पाडणारा
नेमून दिलेले काम कुशलतेने पार पाडणारा
कामाचे नियोजन करणारा

- काही गटांनी शब्दाचा **समानार्थी शब्द, विरुद्धार्थी शब्द** लिहिण्याचाही प्रयत्न केला आहे. **चोरी करणे** - विरुद्धार्थी - परत करणे
(मुलांच्या निरागसपणाचे यापेक्षा बोलके उदाहरण कोणते असू शकेल?)
- **वाक्यात उपयोग** - मुलांनी केलेले वाक्यांत उपयोग आजच्या त्यांच्या दैनंदिन भाषेशी प्रामाणिक होते. काळानुसार बदलते संदर्भ, संकल्पना त्यांच्या वाक्यांतून प्रतीत होत होत्या. प्रत्येक शब्दाचा, शब्दाच्या प्रत्येक अर्थाचा वेगळा असाही काही गटांनी वाक्यात उपयोग केला आहे.

**४. परिशिष्ट**

परिच्छेदाच्या भाषिक वैशिष्ट्यांबद्दल वर्गात मुलांशी बोलणं केलं होतं. त्यानुसार मुलांनी लिहिलेली वैशिष्ट्यं :

- विशेषणांचा मोठ्या प्रमाणावर वापर आढळतो.
- खूपच लांबलचक वाक्ये आहेत.
- भाषेवर संस्कृत भाषेचा पगडा जाणवतो.
- एकेका शब्दांतून व्यापक संकल्पना स्पष्ट होतात.
- अनेक शब्दांना प्रत्यय/उपसर्ग लागले आहेत.
- अनेक शब्दांत संधी आहेत. इ०
- काही गटांनी प्रत्येक अक्षरापासून किती शब्द या शब्दकोशात आले आहेत त्याचीही नोंद केली आहे. प्रत्येक अक्षर वर्णमालेत कितवे आहे त्याचीही नोंद काहींनी केली आहे.

मुलांच्या प्रत्यक्ष शब्दकोशाबद्दलची काही निरीक्षणं मी इथे नोंदवली आहेत. २० प्रकल्पांपैकी ३ गटांचे प्रकल्प संगणकावर मुद्रित केले होते. या प्रकल्पात सर्वच मुलांचा सहभाग उत्तम होता किंवा सर्वच प्रकल्प उत्तम होते असं अर्थातच नाही.

हा 'प्रधान' पाठ, त्यातले शब्द, वाक्यरचना, इ० मुलांना परिचित नाहीत. त्यामुळे पाठ कळण्याच्या दृष्टीने मुलांना खूपच अवघड जातो. अनाकलनीय असे शब्दच शब्द मुलांवर येऊन नुसते आदळतात. कुठल्याही शब्दाशी जेव्हा या ना त्या निमित्ताने तुम्ही संपर्कात येत राहता, तेव्हाच तो शब्द तुमच्या परिचयाचा होतो. मगच तो शब्द तुम्ही प्रत्यक्षात वापरण्याची शक्यता वाढत असते. शब्दकोश प्रकल्प हे असंच एक निमित्त आहे असं मला वाटलं. शिवाय लेखाच्या सुरुवातीला प्रकल्पाची जी उद्दिष्टं मांडली ती बऱ्हंशी सफल झाली असे म्हणायला हरकत नाही. ■

# ‘टपोरी’ बोलीतील ‘फ्यूजन’ वाक्प्रचार

– नेहा किशोर सावंत

साहित्य, समाज आणि संस्कृती यांच्यातील संबंध हा परस्परपूरक आणि परस्परपोषक आहे. तसाच चित्रपट आणि समाज यांच्यातील संबंधही परस्परपूरक आहे, असे म्हटले तर वावगे ठरू नये. कारण चित्रपट हे एकीकडे गतकालीन व समकालीन संस्कृतीचे संवर्धनही करतात, तर दुसरीकडे नवी संस्कृतीही घडवत असतात. विशेषत: बोलीभाषा हा जर संस्कृतीचा महत्त्वाचा घटक मानला, तर आजचे बहुतांश चित्रपट हे एक ‘नवी बोलीभाषा’ घडवताना दिसतात. या नव्या बोली-भाषेचे आजच्या तरुणवर्गाला विशेष आकर्षण असल्याचे दिसून येते. या बोलीभाषेतून विशिष्ट अशा ‘वर्गाची’ वर्तनसंस्कृती अभिव्यक्त होताना दिसून येते. या बोलीभाषेला ‘टपोरी’ भाषा असे म्हटले जाते.

या ‘टपोरी’ भाषेचा नेमका उगम कोठे व कसा झाला हे नेमकेपणाने सांगता येत नाही. साधारणत: सत्तर व ऐंशीच्या दशकातल्या हिंदी चित्रपटांतून ‘अंडरवर्ल्ड’ किंवा ‘माफिया’ जगताचे चित्रण झालेले दिसते. त्यात ‘माफिया’, ‘गुंड-मवाली’ वर्गाची बोलीभाषा म्हणून या भाषेचा वापर झालेला दिसतो. या भाषेला पूर्वी ‘बंबईया’ या नावाचे ओळखले जायचे. माफिया टोळ्यांचे म्होरके अन् त्यांच्या चेल्यांच्या तोंडी अशा प्रकारची भाषा दाखवली जायची. ‘माफिया’, ‘गुंड’, ‘मवाली’ अशा प्रकारच्या माणसांना ‘टपोरी’ असेही संबोधले जायचे म्हणून त्यांच्या तोंडी असलेल्या बोलीला ‘टपोरी बोली’ असे संबोधले जाऊ लागले. ही भाषा केवळ सत्तर-ऐंशीच्या दशकातल्या चित्रपटांतच वापरली गेली आहे असे नव्हे, तर सद्यकालीन ‘मारधाडपट’ हिंदी चित्रपटांतूनही अशा भाषेचा वापर मुक्तपणाने सढळपणे केलेला दिसतो. आणि चित्रपटांच्या प्रभावातून त्यातील अनेक गोष्टींचे अनुकरण करण्याची पद्धत तरुणांमध्ये दिसते. या अनुकरणशील वृत्तीतूनच ही ‘टपोरी’ बोली समाजात विशेषत: तरुणवर्गात रुळलेली किंवा प्रचलित झालेली दिसते. या भाषेची निर्मिती जरी चित्रपटातील मवाली, माफिया, गुंड यांच्या जीवनशैलीची द्योतक म्हणून झाली असली तरी आता ती केवळ त्या वर्गापुरतीच मर्यादित राहिलेली दिसत नाही तर समाजाच्या सर्व स्तरात ती यथेच्छपणे रुळलेली दिसते.

या ‘टपोरी’ भाषेचे स्वरूप ‘सकलभाषा मौलीभूत’ अशा प्रकारचे असते. या भाषेत हिंदी, मराठी, गुजराती, बंगाली अशा विविध भाषांमधले शब्द गुण्यागोविंदाने एकत्र नांदत असूनही ऐकणाऱ्याला ही भाषा समजण्यास अजिबात सायास पडत नाहीत. आजच्या तरुण

वर्गाला (सर्व स्तरांतील) या भाषेने संमोहित केले आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. 'रंगीला', 'खलनायक', 'दबंग', 'शूट आऊट ॲट लोखंडवाला', 'राउडी राठौड', 'सत्या', 'सत्ता', 'मुन्नाभाई एमबीबीएस', 'लगे रहो मुन्नाभाई', 'चांदणी बार', 'कंपनी', 'ट्रॅफिक सिग्नल', 'सलाम बॉम्बे' अशा अनेक चित्रपटांतून तसेच 'हेराफेरी', 'गोलमाल', 'बंटी बबली', अशा निखळ मनोरंजनपर चित्रपटांतूनही या 'टपोरी' बोलीचा वापर केलेला दिसतो. विशिष्ट प्रकारचे भावविश्व व जीवनशैली व्यक्त करण्यासाठीच अशा भाषेची योजना झालेली दिसते. ही 'टपोरी' बोली म्हणजेच आजकालच्या तरुणवर्गाची प्रचलित 'हिंदी' भाषा असल्याचे जाणवते. इतकेच नव्हे तर याच टपोरी भाषेतील अनेक शब्द मराठी भाषेत जसेच्या तसे जिरवून त्यापासून नवी क्रियापदे आणि वाक्प्रचार 'घडवलेले' (की बिघडवलेले) दिसतात.

उदा० हिंदी भाषेतील 'टपकाना', 'बत्ती बुझना', 'पतली गलीसे निकलना' अशी क्रियापदे मराठीत जशीच्या तशी रूपांतरित झालेली दिसतात. जसे की, 'टपकावणे', 'बत्ती बुझणे', 'पतली गलीतून निकलणे' इत्यादी. किंवा इंग्रजी भाषेतील कट (cut) ह्या क्रियापदाचा अर्थ कापणे, विलग करणे, तोडणे असा होतो. मराठी भाषेत शब्दाचे मूळ इंग्रजीवरून 'कटणे' असे क्रियापद करुन त्याला नवीन रूप दिलेले दिसते. त्याचा उपयोगही विलग करणे, तोडणे, दूर करणे या अर्थीच केला जातो. मात्र इंग्रजीत हे क्रियापद वस्तू तोडणे, तुकडे करणे या अर्थी योजला जातो; पण 'टपोरी' बोलीत हा शब्द/क्रियापद वस्तूसाठी न वापरता माणसे विलग करणे, दूर करणे या अर्थी योजला जातो. म्हणजे अशा नव्या रूपातील क्रियापदांवरून किंवा वाक्प्रचारावरून अर्थांतराचीही प्रक्रिया घडताना दिसते. उदाहरणार्थ बंगाली भाषेत 'झोल' हा शब्द कालवण, आमटी, रस्सा या अर्थाने योजला जातो. पण हाच शब्द 'टपोरी' बोलीत योजताना मात्र 'झोल केला' असा वापरला जातो आणि त्याचा अर्थ मात्र गोंधळ केला, अफरातफर केली असा केला जातो किंवा घेतला जातो. तर काही काही इंग्रजी शब्द हे जसेच्या तसेच पण शब्दरूपात न योजता क्रियापदरूपात किंवा वाक्प्रचारांच्या रूपात योजलेले दिसतात.

उदा० शायनिंग मारणे, ट्यूबलाइट पेटणे, शॉट लावणे इत्यादी. हे शब्द वस्तूशी निगडित नसून व्यक्तीच्या कृतीशी निगडित होऊन 'टपोरी' बोलीत अवतरताना दिसतात. येथे गमतीने असे म्हणता येईल, की ज्याप्रमाणे ब्रिटिशांच्या आगमनाने इंग्रजी भाषेच्या प्रभावातून मराठी भाषा 'आंग्लाळली' त्याप्रमाणेच चित्रपटीय हिंदी भाषेच्या प्रभावातून मराठी भाषा 'हिंदाळली', किंवा हिंग्लाळली!

कोणतीही भाषा ही विशिष्ट वर्गाच्या, समाजाच्या लोकांच्या वर्तनसंस्कृतीची द्योतक असते. त्या समाजाच्या विशिष्ट रूढी, परंपरांमधून शब्दांना अर्थपूर्णता येत असते किंवा शब्दाला विशिष्ट अर्थ प्राप्त होत असतो. आणि ही भाषा जनमानसात प्रचलित होऊ

लागली, की त्यातून नवे नवे वाक्‌प्रचार, नव्या म्हणीही आकाराला येत असतात. किंबहुना असे म्हणता येईल, की प्रत्येक वाक्‌प्रचार, म्हणींच्या मागे विशिष्ट समाजाची संस्कृती निगडित असते, विशिष्ट जीवनशैलीचे प्रतिबिंब त्या त्या भाषेतून दिसत असते. या दृष्टीने पाहता या बम्बईया 'टपोरी' भाषेतून नेमकी कोणती संस्कृती दिसते. किंवा कोणती वर्तनशैली दिसते याचा विचार केल्यास एखाद्या मूळ भाषेतील शब्द या 'टपोरी' भाषेत येताना 'अर्थांतरित' किंवा 'रूपांतरित' का होतो यावर प्रकाश पडू शकेल.

ही 'टपोरी' भाषा सर्वसाधारणपणे 'अंडरवर्ल्ड'च्या जगतातील माणसांच्या किंवा माफिया टोळीतील लोकांच्या तोंडी असलेली बहुतांशी चित्रपटांतून (केवळ हिंदीच नव्हे तर 'दुनियादारी', 'टाइमपास' यांसारख्या मराठी चित्रपटांतही दिसून येते.) वापरलेली दिसते. ही भाषा बोलणाऱ्यांची मानसिकता, मनोवृत्तीही विशिष्ट प्रकारची असते हेही निदर्शनास येते. या टपोरी भाषेतून एक प्रकारची 'अरेरावी' व्यक्त होते त्यालाच 'दादागिरीची भाषा' असेही म्हटले जाते.

समोरच्या व्यक्तीवर आपली हुकमत दाखवण्यासाठी, व्यक्तीला दमात घेण्यासाठी या टपोरी भाषेचा वापर होताना दिसतो. भाषाप्रभुत्वापेक्षा आपल्या व्यक्तिमत्त्वाची किंवा 'दादागिरीची' छाप दुसऱ्यांवर पडावी या मानसिकतेतून बहुतांशी तरुणांच्या तोंडी ही बोली रुळलेली दिसते. अशी भाषा बोलणे हे विशिष्ट वयोगटातील तरुणांना भूषणास्पद वाटते.

'टपोरी' भाषेतील बहुतांशी वाक्‌प्रचार तसेच क्रियापदांवर नजर टाकल्यास 'हिंसक प्रवृत्ती', 'फसवणूक', 'हाणामारी', 'त्रासदायक कृत्य', अवमानकारक कृत्य करणाऱ्या, अत्याचारी वृत्तीच्या मानसिकतेचेच किंवा अशी पद्धती असणाऱ्या जीवनाचे दर्शन घडते. या वाक्‌प्रचारांतून किंवा या प्रकारच्या भाषायोजनेमागे कोणतीही कल्पकता, प्रतिभा आढळत नाही. उलट एक प्रकारची निरर्थकता, अर्थशून्यता किंवा विसंगतीच दिसते. (जी या माफियांच्या जीवनातही दिसते). या माफिया वृत्तीच्या लोकांच्या जीवनात जशी नानाविध जातिधर्मांची, प्रांतांची आणि विकारांचीही सरमिसळ झालेली दिसते तशीच विविध भाषांची सरमिसळ त्यांच्या बोलीतही झालेली दिसते. म्हणूनच मी 'फ्यूजन' वाक्‌प्रचार असा शब्दप्रयोग लेखाच्या शीर्षकात योजला आहे.

कोणत्याही भाषेत जेव्हा इतर भाषांतील शब्दरूपे, म्हणी, वाक्‌प्रचार यांची सरमिसळ होते तेव्हा 'भाषासंपन्नतेचा' व 'भाषाभ्रष्टतेचा' मुद्दा उपस्थित होतो तसा तो येथेही उपस्थित होऊ शकेल. आणि या मुद्याला उत्तर द्यायचे झाले तर 'अर्धा पेला रिता की भरलेला?' या पद्धतीनेच ज्याने त्याने शोधायचे आहे. काहींना या 'टपोरी' बोलीमुळे आणि त्यातील वाक्‌प्रचारांमुळे भाषा भ्रष्ट झाली असेही वाटेल, तर काहींना ही भाषा म्हणजे नव्या युगाची, नव्या तरुण पिढीची भाषा आहे असे वाटेल. एकंदरीतच आजचे मानवी जीवन हे जागतिकीकरणाच्या विळख्यामुळे 'ग्लोबल' झाले आहे, मग भाषा तरी मागे कशी राहणार?

या टपोरी बोलीचा अवलंब केवळ चित्रपटांपुरता मर्यादित न राहता साहित्यातूनही केलेला दिसतो. विशेषत: नव्वदोत्तर मराठी कवींच्या कवितांमध्ये उदाहरणार्थ वर्जेश सोलंकी, संजीव खांडेकर, मन्या जोशी, हेमंत दिवटे यांसारख्या कवींच्या कवितांमध्ये ही अशा तऱ्हेची भाषायोजना दिसते. वर्जेश सोलंकी यांच्या 'वर्जेश ईश्वरलाल सोलंकीच्या कविता' आणि 'ततपप' या काव्यसंग्रहांतून अशा प्रकारची बंबईया बोली विशेषत्वाने आढळते. जागतिकीकरणाच्या प्रभावातील चित्रपट, साहित्य व समाज यांचा जेव्हा स्वतंत्रपणे अभ्यास केला जाईल तेव्हा या बंबईया टपोरी भाषेचाही स्वतंत्र विचार करणे क्रमप्राप्त ठरेल. किंबहुना या बोलीचा अभ्यासही साहित्य व समाज यांचा संबंध तपासताना पूरक ठरेल असे म्हटल्यास वावगे ठरू नये.

वाचकांच्या आकलनासाठी 'टपोरी' बोलीतील काही फ्यूजन वाक्प्रचार व क्रियापदे अर्थासकट देत आहे. माझ्या निदर्शनास आलेल्या शब्दांची सूची मी देत आहे. ती परिपूर्ण नाही याची मला पूर्ण कल्पना आहे. यात उत्तरोत्तर भर पडत राहील यात शंकाच नाही.

**टपोरी बोलीतील फ्यूजन वाक्प्रचार व त्यांचे अर्थ**

(१) भेजा फ्राय करणे -
(२) भेजा आऊट करणे/ होणे -
(३) दिमागचा दही करणे -
(४) डोक्याची आईबहीण एक करणे -
(५) खालीपिली आय झेड करणे -
(६) डोक्याला शॉट लावणे -
(७) पकवणे -
— त्रस्त करणे, भंडावून सोडणे, डोक्याला ताप देणे.

(८) रफादफा होणे -
(९) पतली गलीतून सटकणे -
(१०) वंटास होणे -
(११) कल्टी मारणे -
(१२) कटणे -
— गुपचूप पसार होणे.

(१३) शायनिंग मारणे - मोठेपणा करणे, चमकणे
(१४) अंडी पिल्ली बाहेर काढणे - एखाद्याचा ठावठिकाणा शोधणे, आतली माहिती काढणे.

(१५) कानाखाली पेटवणे -
(१६) कानामागे बाराखडी काढणे -
— कानफटात मारणे.

| | |
|---|---|
| (१७) टपकवणे -<br>(१८) ढगात पाठवणे - | — जिवानिशी मारणे. |
| (१९) हड्डी पसली एक करणे | - मारणे. |
| (२०) ए बी सी डी काढणे | - वार करणे. |
| (२१) नाकाबंदी करणे | - अडचणीत आणणे. |
| (२२) खोपच्यात घेणे | - कचाट्यात पकडणे, खिंडीत घेणे. |
| (२३) पत्ता कट करणे | - टाळणे, खिजगणतीत नसणे. |
| (२४) टांग देणे | - दिलेला शब्द न पाळणे. |
| (२५) राडा करणे | - गोंधळ माजवणे. |
| (२६) पंगा घेणे | - बदला घेणे, शत्रुत्व घेणे, भांडण करणे |
| (२७) शाळा घेणे | - खरडपट्टी काढणे. |
| (२८) किडे करणे -<br>(२९) अंगात किडे असणे -<br>(३०) उंगल्या करणे - | — खोड्या करणे, कळ काढणे. |
| (३१) इज्जतीचा फालुदा करणे -<br>(३२) इज्जतीचा भाजीपाला करणे -<br>(३३) इज्जतीचा पंचनामा करणे -<br>(३४) कचरा करणे - | — तुच्छ लेखणे,<br>एखाद्याला कमी लेखणे,<br>अपमान करणे. |
| (३५) चायपाणी देणे -<br>(३६) तोडपाणी करणे - | — लाच देणे, खुशामद करणे. |
| (३७) झोल करणे, झोल झाल करणे | - अफरातफर, भ्रष्टाचार करणे. |
| (३८) दिमागची बत्ती बुझणे | - बुद्धी चालेनाशी होणे. |
| (३९) दिमागची घंटी वाजणे | - कल्पना सुचणे. |
| (४०) दुनिया इधर की उधर होणे | - परिस्थिती आमूलाग्र बदलणे. |
| (४१) ढाचे देणे, लपेटणे | - थापा मारणे. |

धोबीपछाड करणे, चमचेगिरी करणे, भाईगिरी करणे, सडकछाप असणे असे अनेक वाक्प्रचार मराठी भाषेतही सर्रास वापरले जाताना दिसतात. तर विशिष्ट व्यक्तींच्या शरीरयष्टीसाठी किंवा त्यांच्या अल्पबुद्धीचे निदर्शन करण्यासाठी पेंगापाव, सडकछाप, लिंबूचुख्या हड्डीपसली, पतली हड्डी, छप्पन टिकली, भोंगाफाईट, सडक छाप, गया गुजरा, ट्यूबलाइट अशा अनेकविध शब्दांची खैरातही केलेली दिसते. एकूणच हे शब्दांचे मोहजालच आहे याची आपल्याला कल्पना येईल. ■

# अरविंद गुप्तांची वैज्ञानिक खेळणी

– सुशान्त शं० देवळेकर

महाजालावरील मराठी ह्या सदरात ह्या वेळी ज्या संकेतस्थळाचा परिचय करून द्यायचा आहे ते थोडे वेगळे आहे. मराठी संकेतस्थळांचा परिचय करून देताना देवनागरीत आणि युनिकोड संकेतप्रणालीत असलेल्या संकेतस्थळांचाच विचार आपण प्राधान्याने करत असतो. प्रस्तुत संकेतस्थळ हे युनिकोड संकेतप्रणाली वापरून तयार केलेले नाही. तसेच ते केवळ मराठी भाषेतही नाही. तरीही त्याचा परिचय आपण करून घेतला पाहिजे आणि त्यावर उपलब्ध असलेल्या मराठीतील सामग्रीचा लाभ घेतला पाहिजे.

अरविंद गुप्ता हे नाव आपल्यापैकी अनेकांनी ऐकलेले असेल. वैज्ञानिक खेळणी कशी तयार करावी ह्याविषयी त्यांनी लिहिलेली अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी निर्माण केलेल्या http://www.arvindguptatoys.com ह्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या मराठीतील सामग्रीचा परिचय ह्या लेखात करून द्यायचा आहे. विज्ञानशिक्षणासाठी महागड्या उपकरणांची आवश्यकता नसते. विज्ञानातील तत्त्वे सोप्या रीतीने शिकण्यासाठी विविध प्रकारची वैज्ञानिक खेळणी हे एक उत्तम आणि प्रभावी साधन आहे. ही साधने आपण सोप्या तऱ्हेने कशी तयार करू शकतो हे ह्या संकेतस्थळावर उत्तम प्रकारे कळून येते.

वैज्ञानिक खेळणी कशी बनवावीत हे सांगणाऱ्या जवळपास ६०० चित्रफिती ह्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. ह्या चित्रफिती अगदी लहान लहान म्हणजे दोन-तीन मिनिटांच्या आहेत. आपल्या दैनंदिन व्यवहारात आपल्या आजूबाजूला आढळणाऱ्या वस्तूंचा वापर करून टाकाऊतून टिकाऊ वैज्ञानिक खेळणी कशी बनवता येतील ह्याची प्रात्यक्षिके ह्या चित्रफिती आपल्याला दाखवतात. आपल्या दृष्टीने महत्त्वाचे म्हणजे ह्या चित्रफिती मराठीतही उपलब्ध आहेत. म्हणजे त्यांचा ध्वनी मराठीत ऐकू येईल अशी व्यवस्थित सोय केलेली आहे. संकेतस्थळावर चित्रफितींच्या निवेदनांचे भाषांतर करण्यासाठी आवाहन करण्यात आले आहे. चित्रफिती रंजक आणि साध्या सोप्या आहेत. शीतपेये पिण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या नळ्या, जुन्या स्लीपर, खोडरबर, सायकलच्या ट्यूब, पेन्सिली, फुगे अशा साध्या साधनांतून वैज्ञानिक तत्त्वे समजावून देणारी खेळणी इथे पाहायला मिळतात. मराठी मुलांच्या विज्ञानविषयक जिज्ञासेला उत्तम खाद्य पुरवणारे हे संकेतस्थळ आहे.





अनुक्रमणिका

चित्रफितींमध्ये दिसणाऱ्या लेखी सूचना मराठीत आणि देवनागरीत दिसल्या असत्या तर अधिक बरे झाले असते असे वाटत राहते. असे तंत्रज्ञान निश्चितच उपलब्ध असावे. मात्र ह्याबाबत त्या क्षेत्रातील जाणकारांनी काहीतरी करण्याची आवश्यकता आहे.

ह्या संकेतस्थळावरील लक्ष वेधून घेणारा महत्त्वाचा दुसरा भाग म्हणजे ह्या संकेतस्थळावर पीडीएफ स्वरूपात उपलब्ध असलेली भारतातील विविध नऊ भाषांतील पुस्तके आणि लेख मिळून सुमारे साडेचारशे पीडीएफ धारिका ह्या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत. शिक्षणविषयक पुस्तके, बालवाङ्मय, गणितविषयक पुस्तके, विज्ञानविषयक कार्यपुस्तके, पर्यावरणविषयक पुस्तके, प्रेरणादायी पुस्तके अशा वेगवेगळ्या वर्गांत ही पुस्तके विभागून मांडण्यात आली आहेत. ह्यांपैकी बहुतांश पुस्तके ही भाषांतरित स्वरूपाची आहेत. त्यात आयझॅक असिमोव्ह ह्यांच्या 'हाऊ टु फाउण्ड आउट अबाउट' ह्या मालिकेतील पुस्तके, नॅशनल बुक ट्रस्टने प्रकाशित केलेली विविध विषयांवरील भाषांतरित पुस्तके अशी अनेक प्रसिद्ध पुस्तके ह्या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत. अरविंद गुप्ता ह्यांनी लिहिलेली विविध पुस्तकेही इथे उपलब्ध आहेत. तोत्तोचान, प्रिय बाई ह्यांसारखी नावाजलेली पुस्तकेही इथे पीडीएफ स्वरूपात उपलब्ध आहेत.

संकेतस्थळाची रचना अगदी साधी अनलंकृत आहे. चित्रफिती आणि पुस्तके ह्यांची मांडणी करताना त्यांचे स्थूल वर्गीकरण केलेले आहे; पण त्यांच्या दुव्यांच्या याद्या देताना थोडी अधिक मांडणी करता आली असती असे वाटल्यावाचून राहत नाही. सर्व दुव्यांची माहिती लॅटिन लिपीत थोरल्या (कॅपिटल) अक्षराकृतींत दिलेली आहे. पण त्यांचा अकारविल्हे क्रम लावता येऊ शकेल.

विविध भारतीय भाषांतील सामग्री आता त्या त्या भाषेतील वापरण्यात येणाऱ्या लिपीत यायला हरकत नाही. युनिकोड संकेतप्रणालीमुळे आता असे करणे सहज शक्य झाले आहे. लॅटिन अक्षरांत मराठी पुस्तकांची नावे वाचताना नाही म्हटले तरी अडखळायला होतेच. ह्यात सुधारणा झाली तर संकेतस्थळ अधिक नेटके होईल. थोडक्यात काय. लहानांना पाहण्यासाठी आणि वाचण्यासाठी काय द्यायचे असा प्रश्न असेल तर त्याचे उत्तर म्हणून मराठीतील भरपूर सामग्री ह्या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. ■

## निवेदन

'भाषा आणि जीवन' हा हिवाळा २०१५ अंक (वर्ष ३३, अंक १) प्रसिद्ध होण्यास विलंब झाला आहे. त्याबद्दल क्षमस्व.

यानंतरचे उन्हाळा व पावसाळा (वर्ष ३३, अंक २ व ३) हे दोन अंक जोडअंक म्हणून जुलै २०१५मध्ये डॉ० अशोक रा० केळकर विशेषांक म्हणून प्रसिद्ध होतील. डॉ० विजया देव त्या अंकाच्या अतिथी संपादक असतील. – संपादक



अनुक्रमणिका

# अंकलेखन : मराठी, इंग्रजी व चिनी

– नीलकंठ बापट

प्रत्येक समाजाचा संख्येकडे पाहण्याचा दृष्टिकोन वेगवेगळा असतो. प्रत्येकाचे संख्येचे आकलन भिन्न असते. मराठी, इंग्रजी व चिनी लोक अंकांचा विचार कसा करतात हे पाहणे मोठे रंजक ठरेल. विशेषत: ते अंकलेखन कसे करतात ह्यावरून त्यांचा स्वभाव, गणितातील प्रगती, विचारांची सहजता, सुटसुटीतपणा, सोपेपणा समजतो.

सुरुवातीला ० ते ९ ह्या आकड्यांचा विचार करू.

पहिली ओळ - मराठी

दुसरी ओळ - इंग्रजी

तिसरी ओळ - चिनी

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 |
| 一 | 二 | 三 | 四 | 五 | 六 | 七 | 八 | 九 |

तिन्ही लिपींत १ ते ९ साठी स्वतंत्र चिन्हे आहेत. इंग्रजी व मराठीतील पहिल्या तीन संख्यांची चिन्हे दिसायला साधारणपणे सारखीच आहेत. चिनी भाषेतील चिन्हे मात्र वेगळी आहेत. मराठी व इंग्रजी लिपीतील इतर अंकांच्या चिन्हांसाठी गोल, अर्धगोल व उभ्या, आडव्या, तिरक्या रेषा ह्यांचा उपयोग केलेला दिसतो. चिनी लिपीत फक्त रेषांचा उपयोग केलेला दिसतो. चिनी लिपीत अक्षर वा संख्या-लेखनात गोलाकार कुठेही दिसत नाही.

इंग्रजी व मराठी लिपींत शून्यासाठी समान चिन्ह (०) आहे. पारंपरिक चिनी लिपीत शून्यासाठी स्वतंत्र चिन्ह नाही. पण आधुनिक काळात ० किंवा 零 ह्या चिन्हांचा शून्य दर्शवण्यासाठी उपयोग केला जातो. दहा ह्या संख्येसाठी चिनी भाषेत स्वतंत्र चिन्ह आहे. मराठी व इंग्रजीसारखे एकावर शून्य (१०) असे लिहिले जात नाही. तर १०साठी स्वतंत्र चिन्ह (+) हे आहे.

त्याचप्रमाणे १००, १००० व १०००० साठी स्वतंत्र चिन्हे आहेत.

| मराठी | १० | १०० | १००० | १०००० |
|---|---|---|---|---|
| चिनी | 十 | 百 | 千 | 万 |

दोन आकडी रकमा ११ ते १९चे लेखन :

इंग्रजी व मराठी लिपीत समान पद्धत आहे. १च्या पुढे १ ते ९ आकडे लिहिणे, जसे ११, १२ --- १९. मराठी व इंग्रजी भाषेत संख्या लिहिण्यासाठी ० ते ९ हे आकडे वापरतो. प्रत्येक आकड्याची किंमत तो आकडा कोणत्या स्थानावर आहे ह्यावर अवलंबून असते. चिनी लिपीत मात्र एकदम वेगळी पद्धत आहे.

११ ही संख्या अशी लिहिली जाईल : +-. त्यातील + हे चिन्ह दहा दर्शवते व (-) हे चिन्ह एक दर्शवते.

१२ साठी += (१०,२) व १९साठी 十九 (१०,९) असे लिहिणे होईल.

२० साठी (-二十) असे लिहिले जाईल. (२×१०)

२१ साठी ( 二十 ) ह्या ठिकाणी हे लक्षात ठेवले पाहिजे की २१साठी (=-) असे लिहिता येणार नाही. ( 二十 ) ह्याची फोड २ × १०+१ अशी आहे.

तसेच २९ हे चिनी लिपीत 二十九 असे लिहिले जाईल. सोबतच्या कोष्टकात अन्य संख्यांचे लेखन दर्शवले आहे.

| इंग्रजी | मराठी | चिनी | स्पष्टीकरण |
|---|---|---|---|
| 100 | १०० | 百 | १ × १०० |
| 300 | ३०० | 三百 | ३ × १०० |
| 597 | ५९७ | 五百九十七 | ५ × १००+९ ×१०+७ |
| 1000 | १००० | 千 | १ × १००० |
| 12393 | १२३९३ | 萬二千三百九十三 | १×१००००+२×१०००+ ३×१००+९×१०+३ |
| 10000 | १०००० | 萬 | १×१०००० |





अनुक्रमणिका

संख्यांचा उपयोग क्रमवारी दर्शवण्यासाठीही केला जातो. मराठीत १ला, २रा, ८वा असे लिहितात. तसेच इंग्रजीत 1st, 2nd, 3rd, 5th असे लिहिले जाते. चिनी लिपीत क्रमवारी दाखवण्यासाठी संबंधित संख्येच्या मागे 第 हे चिन्ह लिहिले जाते.

उदा०

| | | | |
|---|---|---|---|
| पहिला - | 第一 | दुसरा - | 第二 |
| चवथा - | 第四 | सहावा - | 第六 |

संख्या व्यवस्थापनात अपूर्णांक व टक्केवारी दर्शवण्यासाठी प्रत्येक भाषेत विशेष व्यवस्था असते. अपूर्णांक लिहिताना छेद पहिल्यांदा लिहावयाचा, त्यानंतर 分之 ही दोन अक्षरे लिहावयाची व नंतर अंश लिहावयाचा.

उदा० २/३ हे चिनी लिपीत असे लिहिले जाईल :

三分之二

हे लिखाण बरोबर उलटे आहे. मराठी व इंग्रजीत अंश पहिल्यांदा लिहितात मग भागाकार चिन्ह व शेवटी छेद लिहितात.

चिनी लिपीत '६३ टक्के' असे लिहिले जातील :

शंभर नंतर 分之 सहा गुणिले शंभर अधिक तीन

百分之六百三 ■

**अर्थांध, धर्मांध की विवेकी मनुष्यत्व?**

साम्यवादी राष्ट्रांमधील शासनसंस्था व्यक्तीची कशी गळचेपी करते याच्या अनेक सुरसकथा आपण ऐकलेल्या आहेतच. एक साम्यवादी व्यवस्था तिचा आर्थिक पायाच भुसभुशीत झाल्यामुळे कशी कोसळली व दुसरीने वेळीच शहाणे होऊन आपला आर्थिक पाया भांडवलशाही व्यवस्थेलाही लाजवील अशा प्रकारे कसा बळकट केला आहे हेही आपण पाहिले आहे. या पोस्ट-कॅपिटालिस्ट कॅपिटॅलिझमवर उतारा म्हणून काही शक्ती धर्माचे हत्यार घेऊन पुढे सरसावल्या आहेत. एक शक्ती पुढे ढकलणारी तर दुसरी मागे खेचणारी, अशा पेचप्रसंगातून संपूर्ण मानवजातच चाललेली आहे, त्याला महाराष्ट्र किंवा मराठी साहित्य अपवाद असण्याचे कारण नाही. अशा परिस्थितीत आपण अर्थांध किंवा धर्मांध होऊन कोणाच्या तरी मागे फरफटत जायचे की आपला विवेक शाबूत ठेवून आपल्यातील मनुष्यत्वही जपायचे, हा खरा प्रश्न आहे.

- **डॉ० सदानंद मोरे** (घुमान येथील अध्यक्षीय भाषण)

दखलयोग्य

# मराठी भाषा धोरण : काही शंका; काही प्रश्न!

– प्रा० अभय दातार

राज्यघटनेच्या अनुच्छेद ३४८ (१) (अ)नुसार सर्वोच्च न्यायालयाचे आणि सर्व उच्च न्यायालयांचे कामकाज इंग्रजीत होणे बंधनकारक आहे. अर्थात, ३४८ (२)नुसार राज्यपालांना राष्ट्रपतींच्या पूर्वपरवानगीने एखाद्या उच्च न्यायालयाच्या कामकाजात त्या राज्याच्या राजभाषेचा वापर करण्याची अनुमती देता येते. ही बाब राजकीय आहे हे स्पष्ट आहे. त्यासाठी राज्य सरकारने केंद्र सरकारकडे पाठपुरावा करावा असे काही मसुदा-समितीने स्पष्टपणाने सुचवलेले नाही. नुसतेच यासाठी प्रयत्न करावा असे मोघम विधान केले आहे. (४.१.४ क्र० ५) तसेच याच ३४८ (२) या अनुच्छेदानुसार उच्च न्यायालयाने दिलेल्या कोणत्याही निकालपत्राला अथवा आदेशाला ही तरतूद लागू नाही. म्हणजे कामकाज मराठी आणि निकाल इंग्रजीत. यामुळे उच्च न्यायालयाचे कामकाज सर्वसामान्यांना समजावे, ही समितीची अपेक्षा किती आणि कशी पूर्ण होणार हा यक्षप्रश्न आहे.

महाराष्ट्र वगळता इतर राज्यांतील उच्च न्यायालये ही त्या-त्या राज्याच्या नावाने ओळखली जातात; पण आपल्या उच्च न्यायालयाचे नाव मात्र 'बॉम्बे हायकोर्ट' आहे, असे सांगत महाराष्ट्रावरच कसा अन्याय झाला आहे, असा आव समितीने आणला आहे. वस्तुस्थिती काय आहे? पश्चिम बंगाल, तमिळनाडू आणि उत्तर प्रदेश या तिन्ही राज्यांतील उच्च न्यायालयांची नावे अनुक्रमाने कलकत्ता, मद्रास (चेन्नई नव्हे), अलाहाबाद अशी आहेत. आंध्र प्रदेश आणि तेलंगण या राज्यांच्या संयुक्त उच्च न्यायालयाचे नाव हैदराबाद आहे, तर आसाम, अरुणाचल, मिझोराम आणि नागालँडच्या संयुक्त उच्च न्यायालयाचे नाव गौहात्ती असे आहे.

हीच बाब महाजाल आणि सामाजिक संपर्क माध्यमे यामध्ये मराठीच्या वापरासंदर्भात पुरेशा सुविधा नाहीत, या विधानाची आहे. युनिकोडचे अस्तित्व मसुदा समितीला माहीत नाही असे दिसते. तसेच विकिपीडिया या महाजालीयमुक्त महाकोशात २००३ पासून मराठी टंकलेखनाची सुविधा उपलब्ध आहे, याचा साधा उल्लेखदेखील नाही.

सगळ्या गोष्टींची सक्ती आणि प्रत्येकासाठी सरकारची परवानगी हा शिफारशींबाबतचा समितीचा एकूण दृष्टिकोन आहे. उदारीकरणाच्या पर्वाने यातील बऱ्याच गोष्टींना तिलांजली दिली आहे, हे समितीला बहुधा लक्षात आलेले नाही. जिथे राज्य-संस्थेचे कार्यक्षेत्र आणि प्रभाव आकुंचन पावत आहे, तिथे हा असा राज्य-संस्थावादी

(Statist) दृष्टिकोन काय मिळवून देईल, याचादेखील समितीने विचार केलेला नाही. मराठी भाषेच्या संवर्धनाच्या प्रक्रियेत सरकारची भूमिका महत्त्वाची राहणार आहे, हे निश्चित; पण बदलत्या वास्तवात त्याला मर्यादा आहेत याचे भान समितीला नाही आणि म्हणूनच तिने केलेल्या अनेक शिफारशी या अवास्तव वाटतात, असेच खेदाने म्हणावे लागेल.

आणखीन एक अजब शिफारस म्हणजे इंग्रजी माध्यमांच्या शाळांमधील मराठी भाषक विद्यार्थ्यांना सर्व विषयांची पुस्तके मराठीतदेखील उपलब्ध करून दिली पाहिजेत, ही आहे (४.१.१ क्र० ११). हा शुद्ध द्राविडी-प्राणायाम आहे. इंग्रजी-माध्यमात पाल्याला पाठवण्याचा हेतूच मुळी त्यांना विविध विषयांच्या अध्ययनामार्फत इंग्रजी नीट यावे असा आहे. याने तो साध्य होणार नाही. असे असताना आपल्या पाल्यांना इंग्रजी यावे यासाठी इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालणारा कोणता पालक अशी पाठ्यपुस्तके स्वीकारेल ही साधी गोष्ट मसुदा समितीला समजत नाही की काय? ■

['सकाळ', सप्तरंग, रविवार, २२ फेब्रुवारी २०१५]

## मराठी भाषेचा जाहीरनामा

'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ म्हणजे भगवद्गीतेतील मराठी भाष्य आहे. गीतेवरील संस्कृतेतर-भाषांमधील ते पहिले भाष्य आहे, एवढे सांगितले तरी त्याचे महत्त्व अधोरेखित होऊ शकते.

पण याच ज्ञानेश्वरीत मराठी भाषेचा जाहीरनामासुद्धा आढळतो. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाच्या सुरुवातीला नमनाच्या ओव्यांमधून ज्ञानेश्वर श्री गुरु निवृत्तिनाथ यांना मातृदेवता समजून त्यांच्याकडे मागणे मागतात ते असे :

'नवरसी भरवी सागरु। करवी उचित रत्नांचे आगरु।
भावार्थाचे गिरिवरु। निफजवी माये ॥
साहित्य सोनियाचिया खाणी । उघडवी देशियेचिया आक्षोणी ।
विवेकवेलीची लावणी । हो देईं सैंघ ॥
संवादफलविधानें । प्रमेयाचीं उद्यानें ।
लावीं म्हणे गहनें । निरंतर ॥
पाखांडाचे दरकुटे । मोडी वाग्वाद आव्हाटे ।
कुतर्कांचि दुष्टे । सावजे फेडी ॥
इयें मराठीचियें नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ।
घेणें देणें सुखचि वरी । हो देईं या जगा ॥'

- डॉ० **सदानंद मोरे** (घुमान येथील अध्यक्षीय भाषण)





अनुक्रमणिका

# महाबँक पुरस्कारप्राप्त ग्रंथ : संकल्पनाकोश

–विद्यागौरी टिळक

दरवर्षी भाषा आणि भाषाविज्ञान या विषयांशी संबंधित मराठीतील लेखनाला महाबँक पुरस्कार दिला जातो. त्यासाठी आधीच्या दोन वर्षांमध्ये प्रकाशित झालेले लेखन विचारात घेतले जाते. या वर्षीचा महाबँक पुरस्कार श्री० सुरेश पांडुरंग वाघे यांच्या पंचखंडात्मक 'संकल्पनाकोश' या संचाला मिळालेला आहे.

'संकल्पनाकोश' हा नावावरून एखाद्याला विविध क्षेत्रांतल्या संकल्पनांचे तात्त्विक विवरण करणारा कोश असावा, असे वाटू शकते. संकल्पना या मानसिक-तात्त्विक स्तरावरच आकाराला येत असतात, त्यामुळे तत्संबंधित कोशात असे स्पष्टीकरण असावे, ही अपेक्षा अस्वाभाविक नाही. मात्र प्रस्तुत कोशाचे स्वरूप त्यापेक्षा वेगळे आहे. एखादी संकल्पना प्रत्यक्ष व्यवहारात अवतरते, ती संबंधित वापरक्षेत्रांमधील विविध शब्दांच्या आश्रयाने. हे शब्द एकमेकांशी साम्य-विरोधाच्या, समावेश-बहिष्कृतीच्या नात्यांनी जोडलेले असतात. असे सगळे संबंधित शब्द एकत्रितपणे समोर आले तर त्यातून त्या विषया-संबंधी अनेक गोष्टी लक्षात येतात. वाघे यांच्या संकल्पनाकोशाच्या रचनेमागची भूमिका अशी संबंधित शब्दांच्या माध्यमातून वाचकाला संकल्पनेकडे नेण्याची आहे.

पाच खंडांमध्ये निघालेल्या या कोशाला 'संकल्पनाकोश' असे नाव दिले आहे; परंतु आरंभीच्या पृष्ठावर ग्रंथालयीन कार्डसाठी त्यांनी दिलेल्या तपशिलात ''मराठी पर्यायवाची कोश, समानार्थी व विरुद्धार्थी शब्द व तक्ते यांचा संग्रह'' असे वर्णन आहे. (असे वर्णन देण्याची पद्धतही मराठीत अपवादानेच आढळेल.) त्यावरून कोशाची कल्पना निघाल्या-नंतर, संकल्प जाहीर झाल्यानंतर प्रत्यक्ष कोश प्रकाशित होईपर्यंतच्या कालावधीत वाघे यांनाही हे वेगळेपण ध्यानात आले असावे, असे दिसते.

मुळामध्ये असा कोश करावा ही कल्पना त्यांना सुचली तीही इंग्लिश थिसॉरस पाहात असताना. त्यात जसे समानार्थी, विरुद्धार्थी आणि अलीकडच्या काळात संबंधित शब्दही दिलेले असतात, त्या तऱ्हेचा कोश मराठीत नाही, हे त्यांना जाणवले. त्यांना स्वत:ला विविध स्वरूपाची माहिती जमवण्यात जो रस होता, त्यातून ही योजना आकारत गेली, हा इतिहास त्यांनी पहिल्या खंडामध्ये प्रस्तावनेत नोंदवला आहे.

प्रस्तुत कोश तयार करताना वाघे यांच्या डोळ्यांपुढे विद्वान व तज्ज्ञ अभ्यासकां-ऐवजी सर्वसाधारण माणूसच होता. त्यामुळेही तात्त्विक विश्लेषणे देण्यापेक्षा या रीतीने

शब्द एकत्रित नोंदवणे त्यांना आवश्यक वाटले. शब्द नोंदवत असताना गरजेनुसार त्याची व्याख्या द्यायची असे त्यांनी केले आहे. त्यांनीच नमूद केल्याप्रमाणे शालेय शिक्षण घेतलेला वाचक समोर ठेवतच कोणत्या व्याख्या द्यायच्या आणि किती विस्तृत द्यायच्या याचा निर्णय त्यांनी केलेला आहे.

जीवनाच्या विविध अंगांशी संबंधित असे विषय त्यांनी निवडून त्यामध्ये शब्दांची विभागणी केली आहे. धर्म, काल, विश्व, प्राणी व वनस्पती, मानवी शरीर, कुटुंबसंस्था, नागरिक-जीवन, गुणावगुण, मन व स्वभाव, ललितकला अशा एकूण अकरा क्षेत्रांमध्ये उपयोगात येणारे शब्द त्यांनी या पंचखंडात्मक कोशात संकलित, संपादित केले आहेत. यातून मोठ्या आकाराच्या प्रत्येकी ४०० ते ५०० पृष्ठांचा पाच खंडांमध्ये तयार झालेला कोश हे खरोखरीच खूप मोठे काम आहे.

कोणत्याही क्षेत्रामध्ये चालणारा व्यवहार हा विविध संज्ञांच्या आधारावर चाललेला असतो. अशा विविध संज्ञा समजावून घेताघेता त्या क्षेत्रातला व्यवहारच नव्हे, तर त्यामागच्या बऱ्याच धारणा, कल्पनाही उलगडू शकतात. याचेच प्रत्यंतर प्रस्तुत कोशातून येते. यातील कोणत्याही विषयासंबंधीच्या नोंदी सहज चाळून पाहू लागले, की ते लक्षात येईल. एकीकडे त्यात विषयवार वर्गीकरण आहे, नोंदी चटकन मिळाव्यात यासाठी अकारविल्हे योजना केली आहे. त्याचप्रमाणे साहचर्याने येणाऱ्या संकल्पना लागोपाठही घेतल्या आहेत. प्रत्येक विभागाच्या शेवटी त्यात आलेल्या नोंदींची सूचीही दिलेली आहे. त्यामुळे विविध हेतूंनी कोशाकडे वळणाऱ्या वाचकांची सोयही साधली गेली आहे. उदा० पहिल्या खंडातील 'धर्म' या प्रारंभीच्या विभागात 'अग्नि', 'अलक्ष्मी', 'इंद्र', 'ऋषि', 'कर्ण', 'कार्तिकेय' अशा क्रमाने व्यक्तिविषयक नोंदी येतात. त्यानंतर व्यक्तिविषयक नसलेल्या 'अमृत' या पहिल्या नोंदीनंतर लगेचच 'विष' ही नोंदही येते. या दोन्ही कल्पनांचे साहचर्य पाहता सर्वसाधारण वाचक डोळ्यांपुढे ठेवून त्यांनी अशा ठिकाणी अकारविल्हे क्रमास मुरड घातलेली आहे. त्यामुळे व्यक्तिविशेषांच्या विभागात वर्णानुक्रमी साधारणतः पाळली गेली असली, तरी उरलेल्या भागांत मात्र त्यांचे परस्परसंबंध महत्त्वाचे मानल्याने तो क्रम राखणे शक्य झालेले नाही. प्रत्येक विभागाच्या शेवटी दिलेली सूची मात्र तपशिलात दिलेली आहे. वाचक काय अभ्यासायला कोशाकडे वळेल, याचा अंदाज तेथे योग्य प्रकारे घेतलेला दिसतो.

विशेष उल्लेखनीय बाब म्हणजे या नोंदी करत असताना प्रचंड सामग्री त्यांनी मिळवून अभ्यासली आहे. त्यामध्ये मराठीतले शब्दकोश तर आहेतच; पण इंग्लिश, हिंदी, संस्कृत यासोबतच उर्दू आणि गुजराती भाषांमधील कोश आणि संदर्भसाहित्यदेखील त्यांनी पाहिले आहे. आपण दिलेले शब्द यथायोग्य असावेत, यासाठी घेतलेली ही मेहनत गौरवास्पद आहे. मात्र या नोंदी करत असताना संस्कृतमधील शब्दांचाही त्यांनी मोठ्या प्रमाणावर

समावेश केला आहे, हादेखील एक मतभेदाचा मुद्दा ठरतो. कारण मराठी कोशामध्ये संस्कृत शब्दांच्या नोंदी असाव्यात का, असाच मूळ प्रश्न येतो. मध्ययुगीन साहित्यात असे शब्द येतात, त्यांचे संदर्भ येतात, हे खरे असले तरी ते किती आणि कोणते स्वीकारावेत हे निश्चित करताना त्यांतील काही टाळता आले असते, असे वाटते. असे करत असताना मग काही विषय अपुरे राहिल्यासारखे वाटले असते का, असाही उलटा प्रश्न येतो. त्याचे उत्तरही सोपे नाही.

हा शब्दसंचय करत असताना केवळ छापील पुराव्यांवरही ते अवलंबून राहिलेले नाहीत. बोलीभाषांमधील मोठा शब्दसंग्रह विस्मरणात जातो आहे, ही त्यांची तळमळ असल्याने शक्य तेवढे बोलीभाषांमधले शब्दही त्यांनी समाविष्ट करून घेतले आहेत. त्यासाठी त्यांनी केलेली धडपडही लक्षणीय आहे. उदा० तिसऱ्या खंडातील 'नागरिक-जीवन' या विषयावरील नोंदींमध्ये प्रारंभी भूमी, नगर, रस्ता, निवास, शिष्टाचार इ० साधारण विषय व पुढे व्यवसाय, अर्थव्यवहार, शासनव्यवस्था असे विभाग करून त्यांमध्ये नोंदी केल्या आहेत. त्यांतील खूप माहिती त्या त्या विषयावरील संदर्भग्रंथ मिळवून त्यांनी घेतलेली आहे. यांतील व्यवसायांशी निगडित शब्द गोळा करताना केवळ पुस्तकी माहिती पुरेशी नाही. ग्रंथांमध्ये न आलेले असंख्य शब्द प्रत्यक्ष वापरात आहेत, या जाणिवेतून विविध व्यावसायिकांकडून माहिती मिळवण्याचा प्रयत्न त्यांनी केला. त्याला पुरेसा प्रतिसाद न मिळाल्याने मनाप्रमाणे शब्दसंकलन न झाल्याची खंत त्यांनी नोंदवली आहे. कदाचित आपल्याकडील व्यवसाय व जाती यांची परंपरेने असलेली सांगड आणि जातिबद्ध-रचनेची उतरंड हीदेखील मोकळेपणाने प्रतिसाद देण्याआड आली असेल. अशा स्वरूपाच्या कामाबाबत अनास्था हा तर सार्वत्रिक अनुभव असतो. पण अशा वातावरणातही निष्ठापूर्वक तीसएक वर्षे काम करून त्यांनी जे मिळवले आहे, तेही अतिशय मोलाचे आहे.

जिज्ञासू वाचकाला यात निश्चितच रस वाटण्याजोगा आहे. वाचता वाचता काही ठिकाणी अनपेक्षितपणे मिळणारी माहिती नवीन काहीतरी देऊन जाते. उदा० 'दागिने' (५.१५१) ही नोंद पृ० ११६ ते १५५ अशी प्रदीर्घ आहे. ती वाचता वाचता तिचे सामाजिक, सांस्कृतिक, धार्मिक,इ० क्षेत्रांतील संकल्पनांशी असलेले नाते लक्षात येत जाते. उदा० 'आकण' किंवा 'आकणे' याचा अर्थ 'पायातील पराक्रमसूचक तोडा' असा आहे. पूर्वी शत्रूला जिंकल्यावर त्याचे नाव एका तोड्यावर कोरून तो पायात घालण्याची प्रथा असल्याची नोंद इथे येते आणि त्यामुळे अलंकारांना असलेला एक निराळाच संदर्भ पुढे येतो. तो वाचताना पायात तोडा घालून वादविवाद करणाऱ्या पंडितांच्या हकीकती आठवल्या, की वादपटुत्वाच्याच त्या निशाण्या होत्या हे ध्यानात येते.

क्वचित कुठे एखादी नोंद अनावश्यक वाटू शकते. उदा० पर्वताचे भाग याविषयीच्या नोंदीत 'खिंड' स्पष्ट करण्यासाठी खैबरखिंड, पावनखिंड यांचा तपशील गरजेचा होता

की नाही, याविषयी मतभेद होऊ शकतात. पण केवळ शालेय शिक्षण झालेला वाचक समोर ठेवून कोश निर्माण झाला आहे, त्यामुळे अशा वाचकास या तपशिलाने अधिक काही कळू शकेल, हे म्हणणेही सर्वस्वी निराधार नाही.

काही जागा मतभेदाच्या निश्चितच निघतील. उदा० दुसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेत त्यांनी लेखननियमांबद्दल लिहिले आहे. उच्चारानुसारी लेखन हे त्यांना उचित वाटते. मात्र उलटसुलट नियमांमुळे गोंधळ होतो आहे असे त्यांना वाटते. प्रत्यक्ष उच्चारांचे निरीक्षण करून नियम ठरवावेत असे म्हणून ध्वनिमुद्रित सामग्री जमवून त्यांनी त्याआधारे मराठीची प्रवृत्ती दीर्घ (दीर्घान्त?) उच्चारणाची मानली जात असली तरी प्रत्यक्षात ते ऱ्हस्व होतात, असा निष्कर्ष काढला आहे. तो मान्य करणे कठीण आहे. त्याआधारे त्यांनी त्यांच्या तत्सम शब्दांच्या लेखनाचे समर्थन केले आहे. त्यांनी ज्या तऱ्हेने विविध संदर्भ गोळा करत कोश सिद्ध केला आहे, ते पाहता लेखननियमांचा त्यांना गोंधळ वाटणे स्वाभाविकच आहे. त्यातून मार्ग काढण्याचा प्रयत्न मात्र बरोबर ठरत नाही. कोशातले रूप योग्य मानले जाते, हे ध्यानात घेता तर प्रचलित नियम स्वीकारणेच गरजेचे होते. लक्षणीय बाब अशी की सुरेश वाघे हे स्वतः केमिकल इंजिनिअर आहेत. बी०एस्सी०, बी०एस० इन केमिकल इंजिनिअरिंग (कोलंबिया) असे शिक्षण आणि त्याच क्षेत्रात केलेली कारकीर्दही. अशा ज्ञानशाखांचा भाषेशी काही संबंध नसतो, असा समज लोकप्रिय असूनही मराठीच्या सुदैवाने त्यांनी तसे काही मानले नाही आणि कोशाचे हे काम हाती घेतले. आणखी उल्लेखनीय बाब म्हणजे 'जगावेगळा' (कथासंग्रह), 'किती आवरशी दो करांनी' (कादंबरी), 'नाणेपुराण' व 'भारताची मानचिन्हे' ही माहितीपर पुस्तके आणि २००हून अधिक कथा व लेख हेही त्यांच्या नावावर आहेत. स्वतंत्र सृजनशील लेखनाची क्षमता आणि आवड असणाऱ्या व्यक्ती अशा कामाकडे सहसा वळत नाहीत. कारण त्याला वेळ, मेहनत आणि चिकाटी खूप लागते. अशी क्षमता असूनही कोशकार्यात एवढा प्रदीर्घ काळ घालवण्याचे हे एक विरळा असेच उदाहरण आहे.

भाषा ही केवळ शैक्षणिक-क्षेत्रापुरती मर्यादित नसते, तिचे प्रत्यक्ष जीवनव्यवहाराशी साक्षात् नाते असते. भाषेच्या संवर्धन-संगोपनाची जबाबदारी केवळ प्राध्यापकांची आहे, असे न समजता विविध क्षेत्रांमधील व्यक्ती त्याबाबत क्रियाशील राहतील तर ती भाषा चैतन्यशील राहण्यास मदत होते. श्री० सुरेश वाघे यांनी ही जाणीव ठेवून संकल्पनाकोशाची मोलाची भर मराठीमध्ये घातली आहे, ती निःसंशय पारितोषिकास पात्र आहे. श्री० वाघे यांचे मनःपूर्वक अभिनंदन! ■





अनुक्रमणिका

# भाषांचे भवितव्य आणि शिक्षणाची सर्वसमावेशकता

– रेणुका ओझरकर

मागील दहा वर्षांत शिक्षणक्षेत्राशी संबंधित दोन महत्त्वाच्या घटना भारतामध्ये घडल्या. पहिली घटना : २००५चा राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा प्रसृत झाला, आणि दुसरी घटना : २००९चा शिक्षणाधिकार कायदा संमत झाला. शिक्षणाधिकार कायदा ६ ते १४ वर्षे वयोगटातील सर्व भारतीय मुलांना दर्जेदार शिक्षणाचा हक्क देऊ करत, आपली शिक्षणव्यवस्था सर्वसमावेशक करू पाहात आहे. अभ्यासक्रम आराखडा या सर्वसमावेशक शिक्षणाची गुणवत्ता अधिक चांगली कशी करता येईल याचे मार्गदर्शन करतो. आगामी वर्षात या मसुद्याचे पुनरावलोकन होणार आहे.

शिक्षणाची सर्वसमावेशकता आणि गुणवत्ता या दोन्हींमध्ये भाषेचे अनन्यसाधारण महत्त्व असते. कोणत्या भाषा शिक्षणाचे माध्यम असतात, शाळांमधील व्यवहारांमध्ये कोणत्या भाषा वापरल्या जातात, यांवर मुले खरोखरच शाळेमध्ये सामावली जातात की नाही, तसेच मुलांपर्यंत शिक्षण खरेच पोहोचते की नाही हे अवलंबून असते. याउलट, भाषांच्या निरोगी विकासामध्ये व भाषिक नियोजनामध्येही शिक्षणक्षेत्राचे तितकेच महत्त्व असते. ज्या भाषा शाळांमध्ये वापरल्या जात नाहीत, त्यांच्या अस्तित्वाचाच प्रश्न उभा राहण्याची शक्यता असते. जागतिकीकरणाच्या आजच्या काळात आपल्या भाषांपुढे वेगाने आव्हाने उभी राहत असताना, शिक्षणक्षेत्राची या भाषांच्या घडण्यामध्ये किंवा नष्ट होण्यामध्येही काय भूमिका आहे, याचा विचार करण्याची नितांत गरज आहे.

शिक्षण आणि भाषांच्या भवितव्याचा प्रश्न हा फक्त या दोन क्षेत्रांपुरताच मर्यादित नाही, तर त्याचा संबंध संपूर्ण समाजाच्या शांततापूर्ण अस्तित्वाशी, संवेदनशील व सुजाण समाज घडवण्याशी आणि विकासाशी जोडलेला आहे. विचाराला उद्युक्त न करणारे शिक्षण आणि भाषांच्या अस्तित्वापुढील वाढती आव्हाने हे एक ज्वालाग्राही, विध्वंसक मिश्रण आहे. यातून उभ्या राहणाऱ्या भाषिक-सांस्कृतिक अस्मितांच्या राजकारणामुळे सामाजिक एकोपा धोक्यात येऊन समाज शतखंडित होऊ लागतो. याची प्रचीती महाराष्ट्रातील दुभंगलेल्या समाजकारणातून मिळतेच आहे. म्हणूनच, आपल्या भाषांपुढील वाढती आव्हाने आणि शिक्षणाच्या सार्वत्रिकीकरणासंदर्भातील आपले गेल्या काही दशकांचे अनुभव यांचा एकत्रित विचार करून शिक्षण व भाषा यांचे नाते अधिक परस्परसंजीवक कसे करता येईल हे पाहणे निकडीचे झाले आहे. शिक्षण आणि भाषा या महत्त्वाच्या क्षेत्रांतील

घडामोडी, त्याबद्दलची धोरणे, त्यांच्या विकासाविषयीचे प्रतिमान यांबाबत संबंधित क्षेत्रांतील कार्यकर्ते, व्यावसायिक, विचारवंत या सर्वांनीच एकत्र येऊन हस्तक्षेप करण्याची गरज आहे, अशी मुंबई विद्यापीठाच्या भाषाविज्ञान विभागाची भूमिका आहे. त्यासाठी, विद्यापीठीय स्तरावरील संशोधक, विचारवंत, समाजातील विचारवंत, शिक्षणतज्ज्ञ यांनी आपल्या वर्तुळातून बाहेर पडून प्राथमिक शाळांमधील शिक्षक, पालक, सामाजिक चळवळींतील कार्यकर्ते यांच्याशी संवाद साधला पाहिजे आणि त्यांनी एकत्र येऊन काही कृती करायला पाहिजे, अशी या विभागाची धारणा आहे. या दृष्टीने मुंबई-विद्यापीठाचा भाषाविज्ञान-विभाग आणि पुण्यातील डॉ० रखमाबाई-शैक्षणिक-संसाधन व संशोधन-केंद्र (युनिक फौंडेशन) यांनी संयुक्तरीत्या 'शिक्षणाधिकार कायदा आणि आपल्या भाषांचे भवितव्य' या विषयावर एका तीन दिवसांच्या राष्ट्रीय परिसंवादाचे नुकतेच आयोजन केले होते. त्यासाठी भाषाविज्ञान-विभागाचे प्रमुख डॉ० अविनाश पांडे व त्यांचे सहकारी, तसेच युनिक-फौंडेशनच्या विनया मालती हरी व त्यांच्या सहकाऱ्यांनी पुढाकार घेतला होता. दि० ९ ते ११ मार्चदरम्यान पार पडलेल्या या परिसंवादामध्ये भारतातील भाषावैज्ञानिक, शिक्षणतज्ज्ञ, भाषाविषयक व शिक्षणविषयक चळवळींमधील कार्यकर्ते तसेच संपूर्ण महाराष्ट्रात सरकारी प्राथमिक शाळांमध्ये शिकवणारे सुमारे २५ शिक्षक यांनी सहभाग घेतला होता.

हा परिसंवाद म्हणजे आगामी वर्षातील व्यापक कार्यक्रमाची नांदी असल्याचे डॉ० अविनाश पांडे आपल्या प्रास्ताविकात म्हणाले. परिसंवादामधील मांडणी, चर्चा, तसेच परिसंवादादरम्यान झालेल्या शिक्षकांबरोबरच्या सभांमधील चर्चेमधून पुढील कार्यक्रमाची रूपरेषा आखण्यात येत आहे. पुढील वर्ष-दोन वर्षांमध्ये संपूर्ण महाराष्ट्रात प्राथमिक शिक्षकांच्या कार्यशाळा व इतर उपक्रमांचे आयोजन करून भारतातील बहुभाषिक, बहुसांस्कृतिक जडणघडणीला पूरक अशा, भाषांच्या विनाशाला नव्हे तर विकासाला कारणीभूत ठरणाऱ्या सर्वसमावेशक दर्जेदार शिक्षणाच्या दिशेने पाऊल टाकण्याचे मुंबईच्या भाषाविज्ञान विभागाचे व डॉ० रखमाबाई केंद्राचे उद्दिष्ट आहे.

तीन दिवसांच्या या परिसंवादामध्ये, भारतातील भाषांच्या विकासाच्या दृष्टीने आपले शैक्षणिक धोरण काय असावे, भारतातील बहुभाषिकता टिकवून ठेवण्यामध्ये शिक्षण-व्यवस्थेचे काय योगदान राहील, तसेच, शिक्षणाचे सार्वत्रिकीकरण अधिक लोकशाही पद्धतीने करण्यासाठी या बहुभाषिकतेचा कसा वापर करून घेतला पाहिजे, आजवर परिघा-बाहेर राहिलेल्या समाजगटांना, भाषिक समूहांना शिक्षणव्यवस्थेत आणण्यामध्ये या बहुभाषिकतेची कशी मदत होऊ शकेल, भारतातील शाळा भाषांना मारक न बनता तारक कशा बनू शकतील अशा विषयांवर शिक्षणहक्क-कायद्याच्या पार्श्वभूमीवर चर्चा झाली.

परिसंवादामध्ये बहुभाषिकता म्हणजे काय यावर बरीच चर्चा झाली. बहुभाषिक म्हणजे केवळ अनेक भाषा वापरता येणे नव्हे, अशी भूमिका बऱ्याच जणांनी मांडली. परिसंवादाचे

उद्घाटन करताना (पद्मश्री) डॉ० गणेश देवी म्हणाले, की भारताची बहुभाषिकता अनन्यसाधारण आहे, आणि तिच्या समस्याही तेव्हा त्यांवरील तोडगेदेखील अनन्यसाधारणच असले पाहिजेत. एकीकडे इंग्रजीचे फायदे आणि दुसरीकडे आपल्या भाषा यांची निवड करू पाहताना द्विधा मन:स्थितीत सापडलेल्या भारतीय समाजाला यातून बाहेर पडायचे असले, तर शिक्षणामध्ये बहुभाषिक दृष्टिकोन अंगीकारणे आवश्यक आहे. बहुभाषिक दृष्टिकोन अंगीकारणे म्हणजे केवळ शाळेत एकापेक्षा जास्त भाषा वापरणे नव्हे, तर एखाद्या मुलाला तो एक विशिष्ट भाषा बोलतो म्हणून शाळेत प्रवेश न नाकारणे.

चेन्नईतील भारतीय प्रौद्योगिक संस्थानातील भाषावैज्ञानिक डॉ० राजेशकुमार यांनी-देखील बहुभाषिकता म्हणजे केवळ अनेक भाषा अवगत असणे नव्हे, असे प्रतिपादन केले. भाषा मुळातच लवचीक असल्यामुळे भाषाभाषांमधील सीमारेषा धूसर असतात, आणि म्हणूनच एक, दोन, अनेक अशी भाषांची गणना करताच येत नाही. भाषा अवगत करण्याची पद्धत, भाषेची संरचना व भाषिक बदल या सर्व बाबतींतील या भाषेच्या लवचिकतेचे भान शिक्षकांना असणे आवश्यक असल्याचे ते म्हणाले.

मुंबई विद्यापीठाच्या भाषाविज्ञान विभागाचे प्रमुख व परिसंवादाचे आयोजक डॉ० अविनाश पांडे यांनी शिक्षणहक्क-कायद्याच्या पार्श्वभूमीवर भारतातील सध्याच्या भाषिक-संघर्षांचा वेध घेताना असे सांगितले, की आर्थिकदृष्ट्या सबल भाषांच्या वाढत्या प्रसारामुळे स्थानिक पातळीवरील आपल्या अर्थ ('मीनिंग')निर्मितीच्या प्रक्रियेवरही आक्रमण होत असते. अर्थनिर्मितीच्या प्रक्रियेवर नियंत्रण राहिले नाही, की भाषा परकी होते. शाळांमधील भाषिक व्यवहारांमध्ये केवळ एकापेक्षा जास्त भाषा आणून प्रश्न सुटणार नाहीत, तर भाषेमधून होणाऱ्या अर्थनिर्मितीच्या प्रक्रियेबाबत मुले स्वायत्त असतात की नाही ते पाहणे अधिक गरजेचे असल्याचे त्यांनी म्हटले. ते पुढे म्हणाले, की एकापेक्षा जास्त भाषांमधून उपलब्ध होणाऱ्या अर्थनिर्मितीच्या अनेक प्रक्रिया, तसेच एकाच भाषेच्या अंतर्गत असणाऱ्या देखील विविध अर्थनिर्मितीच्या प्रक्रिया हाताळण्याचे कौशल्य म्हणजे बहुभाषिकता.

दिल्ली विद्यापीठाच्या शिक्षणविभागात कार्यरत असणाऱ्या राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या (NCERTच्या) पाठ्यपुस्तक मंडळामध्ये सहभागी असणाऱ्या डॉ० अनिता रामपाल यांनी आपल्या बीजभाषणामध्ये शैक्षणिक-व्यवहारांमधील भाषेच्या महत्त्वाच्या स्थानाविषयी विवेचन केले. भाषेबद्दलच्या आणि बुद्धिमत्तेबद्दलच्या अनेक मिथकांविषयी त्यांनी चर्चा केली. त्या म्हणाल्या, की भाषा अवगत करणे म्हणजे केवळ बोलणे, ऐकणे, लिहिणे, वाचणे ही चार कौशल्ये आत्मसात करणे नव्हे. भाषा हा एक जगाकडे बघण्याचा दृष्टिकोन असतो. त्यामुळे, नवे दृष्टिकोन जसे भाषेतून घडवता येतात, तसेच जुने पूर्वग्रहसुद्धा भाषेतून पुढे संक्रमित होत असतात याचे भान ठेवणे आवश्यक आहे. दुसऱ्या दिवशी 'अभ्यासक्रमांमधील भाषा' या विषयावरील आपल्या मांडणीमध्ये

डॉ० रामपाल यांनी २००५च्या राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखड्यानुसार तयार केलेल्या राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या (NCERTच्या) नव्या पाठ्यपुस्तकांच्या उदाहरणातून हे दाखवून दिले, की सर्वच विषयांच्या अभ्यासक्रमांमध्ये भाषेचा कल्पक आणि काळजीपूर्वक वापर करून नवे दृष्टिकोन मुलांपर्यंत पोचवता येतात. भाषेचा अंतर्भाव सर्वच विषयांच्या पाठ्यपुस्तकांमध्ये करून ज्ञान अधिक प्रभावीपणे देता येते.

दिल्लीच्या राज्य पाठ्यपुस्तक मंडळाच्या सदस्य सोनिका कौशिक यांनीदेखील २००५-च्या राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखड्यानुसार नव्याने हिंदीची पाठ्यपुस्तके तयार करण्याच्या प्रक्रियेतील आपले अनुभव सांगितले. पाठ्यपुस्तकनिर्मितीच्या प्रक्रियेची त्यांनी शिक्षक-प्रशिक्षणाशीसुद्धा सांगड घातली. अनेक उदाहरणांतून कौशिक यांनी असे स्पष्ट केले, की शिक्षक-प्रशिक्षणामध्ये पाठ्यपुस्तकांच्या वापराविषयीचे प्रशिक्षण अंतर्भूत करणे आवश्यक आहे, तसेच पाठ्यपुस्तकेही मुलांप्रमाणेच शिक्षकांसाठीही लिहिलेली असली पाहिजेत.

बालभारतीच्या मराठी पाठ्यपुस्तक मंडळावर कार्यरत असणाऱ्या किशोर दरक यांनीही बालभारतीच्या प्राथमिक स्तरावरील मराठीच्या आगामी पुस्तकांमधील भाषिक वैविध्याला न्याय देऊ पाहणाऱ्या नव्या प्रयोगांची माहिती दिली. सांस्कृतिक व भाषिक वैविध्य अंतर्भूत केल्याशिवाय शिक्षण खऱ्या अर्थाने सर्वसमावेशक होऊ शकणार नाही असे ते म्हणाले.

असाच मुद्दा तुमकूर विद्यापीठातील भाषावैज्ञानिक डॉ० ए०पी० अर्श्विनकुमार यांनी मांडला. ते म्हणाले, की आपल्या दैनंदिन भाषा समाजाच्या परंपरा आणि व्यवहारांमध्ये रुजलेल्या असतात, त्यांची जाणीव मुलांमध्ये निर्माण करणे म्हणजे मुलांचे सामाजिकी-करण होणे. या भाषा ज्ञानाच्या विषयवस्तू 'घडवणाऱ्या' रूपकांनी व्यापलेल्या असतात. विषयवस्तूविषयीचे बोलणे, विषयवस्तूला जाणून घेणे अशा रूपकांशिवाय शक्यच होत नाही; कारण ही रूपके एखाद्या अमूर्त वस्तूला मूर्तरूप देऊ करतात. या रूपकांमधूनच, जसे जसे त्या वस्तूबद्दलचे आपले ज्ञान वाढत जाते, तसे तसे, वस्तूचे वर्णन करणारी रूपके निर्माण होऊ लागतात. उदाहरणार्थ, जीवनाविषयी काहीही बोलणे, जीवनाचे स्वरूप जाणून घेणे, हे रूपकाशिवाय शक्यच नाही. तेव्हा आपण 'जीवन हा एक प्रवास आहे' असे रूपक (वस्तू 'घडवणारे' रूपक) कळत-नकळत निर्माण करतो. त्यातूनच, 'जीवनातील चढउतार', 'जीवनाच्या वळणावर/वाटेवर' असे शब्दप्रयोग आपल्या भाषेत रुळतात. या प्रयोगांमध्ये त्या मूळच्या वस्तू 'घडवणाऱ्या' 'प्रवासा'बद्दलच्या रूपकामधून निर्माण झालेली वर्णनात्मक रूपके आहेत. अशा प्रकारे या दोन प्रकारच्या रूपकांच्या परस्परसंबंधातून ज्ञाननिर्मिती होत असते. शिक्षणाचा उद्देश ज्ञाननिर्मिती हा असेल, तर या दोन्ही प्रकारच्या उपमांचा परस्परसंबंध प्रस्थापित करणे गरजेचे आहे, म्हणजेच, दैनंदिन व्यवहारात रुजलेल्या भाषा आणि औपचारिक भाषा यांचाही मेळ घालणे आवश्यक आहे.

मुंबई-विद्यापीठाच्या भाषाविज्ञान-विभागातील रेणुका ओझरकर यांनी नुकत्याच प्रसिद्ध

झालेल्या मराठीच्या विकासाच्या आगामी २५ वर्षांच्या भाषिक धोरणाची दिशा स्पष्ट करणाऱ्या कोत्तापल्ले समितीच्या मसुद्यातील भाषा व शिक्षण या संदर्भातील मुद्यांवर चर्चा केली. या समितीच्या मांडणीमधून अजूनही एकभाषी दृष्टिकोनच अनुस्यूत असलेला दिसतो. मराठी भाषेच्या विकासाचे असे एकभाषी प्रतिमानच पुढे रेटले, तर महाराष्ट्रातील अनेक छोट्यामोठ्या बोली, आदिवासी भाषा यांना धोका उत्पन्न होईलच; पण मराठी भाषेच्या विकासाचे धोरणही प्रत्यक्ष अमलात आणणे शक्य होणार नाही, असे त्या म्हणाल्या.

हैदराबादच्या इंग्लिश ॲण्ड फॉरिन लँग्विज युनिवर्सिटीमधील संशोधक शिरीन इराणी यांनी अंध विद्यार्थ्यांचा सर्वसामान्य शाळांमध्ये समावेश करण्याच्या शिक्षणहक्क कायद्याच्या आश्वासनाच्या अंमलबजावणीमधील अडचणींची चर्चा केली. त्यांच्या मते, सर्वसामान्य शालेय अभ्यासक्रम नकळत दृक्संवेदनांवर अवलंबून असतो, आणि त्याचे स्वरूप बदलल्याखेरीज अंध विद्यार्थी खऱ्या अर्थाने मुख्य प्रवाहात येऊ शकणार नाहीत.

मुंबई विद्यापीठाच्या राजीव गांधी केंद्रातील डॉ० चंद्रकांत पुरी यांनी महाराष्ट्रातील भटक्या जमातींच्या परिस्थितीचा आढावा घेत असे सांगितले, की या समाजाची मुले तर अजूनही शिक्षणहक्क-कायद्याच्या परिघाबाहेर राहिलेली असून त्यांच्या भाषा व ती मुले यांना शाळेच्या प्रवाहात आणणे हे गंभीर आव्हान आहे.

आजच्या शिक्षणव्यवस्थेतील आपल्यापुढील आव्हानांचा आढावा घेताना डॉ० मॅक्सीन बर्नसन म्हणाल्या, की मातृभाषेतून शिक्षण घेणाऱ्या मुलांच्या कल्पनाशक्तीचा व बौद्धिक क्षमतांचा विकास अधिक चांगल्या पद्धतीने होतो हे खरे असले, तरी या शाळांमध्ये सारे काही आलबेल असते असे नव्हे. बरेचदा या शाळांमधून बोलीभाषा, आदिवासी भाषांचा समावेश नसतो. उलट या भाषा बोलणाऱ्या मुलांच्या मनात आपल्या भाषांविषयी न्यूनगंड निर्माण केला जात असतो, आणि आपल्या हातून असे घडते आहे याची शिक्षकांना जाणीवही नसते! इंग्रजीसारख्याच आपल्या भाषाही इतर भाषांच्या विनाशाला कारणीभूत ठरत आहेत. एकंदर शिक्षणाचा दर्जा व अशा प्रकारचे भाषिक दुरभिमान यांचे दुहेरी आव्हान आपल्यासमोर आहे. यातून मार्ग काढायचा तर, आदिवासी भाषा शिकून घेऊन शिक्षकांनी वर्गामध्ये प्रमाण भाषेतील पुस्तकांची रुजुवात मुलांशी त्यांच्याच भाषेतून घालून देण्याची गरज आहे. इंग्रजीचे महत्त्व आपण नाकारू शकत नाही; पण त्याचा फायदा सर्वांना कसा मिळणार हा प्रश्न आहे. त्यासाठी आपल्या भाषा, आदिवासी समाजाच्या भाषा यांचा आपण उपयोग करून घेऊ शकतो का? तसे करून घेण्यासाठी प्रचंड संशोधन, शिक्षणसाहित्य, शिक्षक आणि अर्थातच सामाजिक व राजकीय इच्छाशक्तीची गरज आहे, असे डॉ० बर्नसन म्हणाल्या.

महाराष्ट्रातील दुर्गम प्रदेशातील समाज व आदिवासी समाजांमध्ये शिक्षण पोचवण्याचे काही प्रयत्न गेल्या बऱ्याच वर्षांत अनेक स्वयंसेवी संस्थांनी केले आहेत. त्यांतीलच काही

अभिनव उपक्रमांचे अनुभव परिसंवादात मांडण्यात आले. 'निमकर फौंडेशन'चे निलेश निमकर यांनी त्यांच्या संस्थेने अंगीकारलेल्या वर्गामध्ये बहुभाषिक पद्धतीने शिकवण्याच्या पद्धतीचे उदाहरण दाखवले.

तसेच, डहाणूजवळील ऐने-दाभोण येथील 'ग्राममंगल' संस्थेचे संचालक प्रा० रमेश पानसे यांनी वारली मुलांसाठी चालवलेल्या बालवाडी उपक्रमांच्या अनुभवातून भाषिक गरिबीचा आर्थिक व सांस्कृतिक गरिबीशी असणारा नातेसंबंध उलगडून दाखवला. ते म्हणाले, की आदिवासी समाजामध्ये आर्थिक गरिबीच्या बरोबरीने मुलांकडे तोकड्या शब्दसंपदेसह भाषिक गरिबीही चालून येत असते. सर्वांगीण विकासाला आवश्यक अशा संपन्न सांस्कृतिक अनुभवविश्वांच्या अभावीही मुलांची भाषिक संपदा, अभिव्यक्ती विकसित होत नाही. त्याचे परिणाम मुलांना शाळेत लेखन-वाचन शिकण्यावर होतात. मुलांच्या सांस्कृतिक व भाषिक अनुभवांतील संपन्नतेचा अभाव दूर करणे हे बालवाडीचे कार्य असते, असे ते म्हणाले.

अलिगढ विद्यापीठातील भाषावैज्ञानिक डॉ० इम्तियाज हस्नैन यांनी वर्गातील व्यवहारांमध्ये शिक्षकाला समाजभाषाविज्ञानाचे, भाषेच्या सामाजिक, व्यावहारिक पैलूंचे ज्ञान किती आवश्यक असते, ते स्पष्ट केले. समाजभाषावैज्ञानिक जाणिवांच्या अभावी भाषेबद्दलची मिथके आणि भाषिक शुद्धाशुद्धतेच्या कल्पना, एकाच एका भाषाप्रकाराचे वर्चस्व यांसारखे घातक दृष्टिकोन मुलांपर्यंत, पर्यायाने पुढच्या पिढीपर्यंत प्रसृत होत असतात. प्रमाणभाषा व बोली यांतील फरक हे असेच एक मिथक असल्याचे ते म्हणाले.

शिक्षणाच्या सर्वसमावेशकतेचा विचार करत असताना, तंत्रज्ञानाची, जोड कशी मिळेल हेही पाहिले पाहिजे. बंगळूरू येथील सेंटर फॉर इंटरनेट ॲण्ड सोसायटीमधील तन्वीर हसन यांनी विकिपीडियासारख्या खुल्या तत्त्वावर, समावेशक पद्धतीने उभ्या करण्यात आलेल्या व्यासपीठाची उपस्थित शिक्षकांना ओळख करून दिली. आपापले अनुभव आणि विविध परिस्थितींमध्ये शिकवत असताना, आपापल्या पद्धतींनी अडचणींतून मार्ग काढणाऱ्या शिक्षकवर्गाला परस्परसहकार्यासाठी विकिपीडियासारख्या माध्यमांचा कसा उपयोग करून घेता येईल, त्याची चर्चा झाली.

परिसंवादाचा समारोप करताना ज्येष्ठ भाषावैज्ञानिक प्रा० प्रोबाल दासगुप्ता यांनी शिक्षण आणि लोकशाही समाजरचना यांची सांगड घालत शिक्षणातील भाषांतराचे महत्त्व प्रतिपादन केले. ते म्हणाले, की साक्षरता म्हणजे विविध दृष्टिकोन आत्मसात करणे आणि शिक्षणाचे उद्दिष्ट साक्षरता साध्य करणे. गांधीजी, टागोर यांच्या लेखीदेखील शिक्षणाचे उद्दिष्ट अनेकविध दृष्टिकोन आत्मसात करण्याची संवेदना, सहिष्णुता, खुलेपणा नागरिकांमध्ये निर्माण करणे हेच होते. शिक्षणाचे अंतिम उद्दिष्ट हेच आहे; परंतु, या लांब पल्ल्याच्या ध्येयाकडे वाटचाल करताना परिघावरच्या समाजांचे दृष्टिकोन शिक्षणात

समाविष्ट करण्याचे छोटे ध्येय ठेवणे गरजेचे आहे. आणि यासाठी भाषांतराच्या माध्यमातून विविध भाषा, त्यांतील विविध दृष्टिकोन यांची ओळख मुलांना करून देता येते. भाषांचा विकासही इतर भाषांच्या सान्निध्यातच होतो, आणि त्यासाठी शिक्षणामध्ये भाषांतराचा समावेश अपरिहार्य असल्याचे त्यांनी सांगितले. आहे असे/

(मुंबई विद्यापीठातील 'शिक्षणाधिकार-कायदा आणि आपल्या भाषांचे भवितव्य' या विषयावरील परिसंवादाचा वृत्तान्त) ■

भाषा-वार्ता २

## भाषाविकास-संशोधन-संस्था, कोल्हापूर

– नंदकुमार मोरे

भाषा आणि बोलींच्या अभ्यास व संशोधनासाठी, भाषाविकास-संशोधन-संस्था, कोल्हापूर ही संस्था सन २००५मध्ये स्थापन करण्यात आली. या संस्थेतर्फे सीमाभागातील बोलीभाषांच्या संशोधनाचे, शब्दसंग्रहाचे आणि लोकसाहित्याच्या संकलनाचे काम सुरू आहे. चंदगड तालुक्यातील शालेय विद्यार्थ्यांकरवी बेळगाव व कोल्हापूर या जिल्ह्यातील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी विविध उपक्रम राबवण्यात येत आहेत. त्यामध्ये वक्तृत्व स्पर्धा, स्पर्धापरीक्षा मार्गदर्शन कार्यशाळा, कथाकथन आणि पाठ-अभिवाचन स्पर्धा हे उपक्रम आहेतच. शिवाय बोलीभाषेतील एक प्रबोधनपर नाट्यछटा बसवण्यात आली आहे. त्याचबरोबर गेल्या दोन वर्षांपासून सीमाभागातील शालेय विद्यार्थ्यांसाठी 'प्रज्ञाशोध' ही अभिनव स्पर्धा घेतली जात आहे. ही स्पर्धा संपूर्ण बेळगाव-जिल्ह्यातील शाळांमधून घेतली जाते. पूर्ण मराठी भाषेत घेतली जाणारी ही स्पर्धा सीमाभागातील विद्यार्थी मराठी भाषेशी जोडलेले राहावेत, त्यांना मराठी भाषेतील एक तरी उपक्रम करता यावा या उद्देशाने घेतली जाते. या वर्षी या स्पर्धेला सुमारे १,७०० विद्यार्थी बसले. दि० ८ मार्च रोजी त्यांपैकी ११३ विद्यार्थ्यांना रोख रकम, ग्रंथ आणि प्रमाणपत्र या स्वरूपात डॉ० राजन गवस यांच्या हस्ते बक्षिसे देण्यात आली.

त्याचप्रमाणे सीमाभागातील विद्यार्थ्यांना व्याकरण आणि भाषा म्हणजे काय हे अतिशय सोप्या पद्धतीने समजावून सांगणारे 'अभिनव-मराठी-व्याकरण' हे पुस्तक भाषाविकास-संशोधन-संस्थेच्या वतीने अलीकडेच प्रकाशित करण्यात आले आहे. दोन महिन्यांच्या कालावधीत, ५०/- रुपये किंमत असलेल्या या पुस्तकाच्या सुमारे एक हजार प्रती केवळ सीमाभागातच विकल्या गेल्या. ■





अनुक्रमणिका

# प्राथमिक शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच असावे का?

– विवेक सबनीस

मराठीसह इतर भाषांमुळेही मुलांचे शैक्षणिक व्यक्तिमत्त्व फुलण्यास हातभार लागतो असा अनुभव शिक्षणक्षेत्रात काम करणाऱ्या तज्ज्ञांनी एका परिसंवादात व्यक्त केला. इतिहास हा विषय मराठीतून तर विज्ञान आणि गणित या विषयांची तोंडओळख इंग्रजीतून झाली तर त्या विषयांचा पाया पुढे अधिक भक्कम व्हायला मदत होते, असे मतही नोंदवले गेले.

प्रबोधन मंचातर्फे आयोजित करण्यात आलेल्या 'प्राथमिक शिक्षणाचे माध्यम मातृभाषाच असावे का?' या विषयावरील या परिसंवादाचे उद्घाटन ज्येष्ठ समीक्षक डॉ० द०भि० कुलकर्णी यांनी केले, तर ज्येष्ठ शिक्षणतज्ज्ञ रमेश पानसे यांनी अध्यक्षीय समारोप केला.

द०भि० म्हणाले, की महाराष्ट्रात प्राथमिक शिक्षण हे मराठी मातृभाषेतून असायला हवे, त्याप्रमाणेच मातृभाषेतले शिक्षण हे माध्यमिक शाळेतही असायला हवे. त्यास अपवाद फक्त बृहन्महाराष्ट्रातील भागांमधील शाळांपुरता असावा. किंबहुना विज्ञान-तंत्रज्ञान/ व वैद्यक- शास्त्रातील अत्युच्च शिक्षणही मातृभाषेतूनच असायला हवे.

ते पुढे म्हणाले, की मुलावर गर्भापासूनच मातृभाषेचे संस्कार होतात. मातृभाषा हीच आपल्या आत्म्याची भाषा असून तो आपल्या अस्तित्वाचा मूलस्रोत असतो. भाषासंस्थेचे पावित्र्य आपल्याला कळले तर मातृभाषेचे महत्त्व प्राथमिक स्तरावर का आवश्यक आहे, तेही कळेल. मातृभाषा नसलेले लोकच आपली मातृभूमीही गमावतात.

पुण्यातील चंदननगर येथील एअरफोर्स शाळेच्या मुख्याध्यापिका माधुरी सहस्रबुद्धे यांनी मातृभाषेतून शिक्षण घेताना इंग्रजीला डावलून चालणार नाही, हा मुद्दा आग्रहाने मांडला. त्या म्हणाल्या, की शास्त्र आणि गणित शिकवताना भविष्यात मुलाला त्याच्या परिभाषेत अडचणी येऊ नयेत यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न व्हायला हवेत. हे दोन्ही विषय मराठीतून शिकवतानाही त्यासाठी लागणारी परिभाषा तीच म्हणजे इंग्रजीच ठेवता येईल. यासाठी तसा अभ्यासक्रम मराठीत विकसित करण्याची गरज आहे. प्राणवायू आणि प्रकाशाचे संश्लेषण असे म्हणण्याऐवजी ऑक्सिजन आणि फोटोसिंथसिस हे शास्त्रीय शब्द प्राथमिक शाळेतही मराठीतूनच शिकवले पाहिजेत.

त्या म्हणाल्या, की प्राथमिक शाळेत इतिहास हा विषय मात्र मातृभाषेतून शिकवला,





अनुक्रमणिका

तर तो हृदयाला भिडतो. गणित आणि शास्त्र हे विषय इंग्रजीतून शिकवावेत. माध्यमिक शाळेत इंग्रजी शब्द आणि परिभाषा समजावून घेण्यातच ३ ते ४ वर्षे जाऊ नयेत याची काळजी प्राथमिक शाळेतच घेतली पाहिजे. तसेच राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण केंद्राच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार हे दोन्ही विषय प्राथमिक शाळांमध्येही त्या पातळीपर्यंत पोचायला हवेत, तसे ते अद्याप पोचलेले नाहीत.

सहस्रबुद्धे यांच्या मते मराठी जरी आपली मातृभाषा आणि राज्यभाषा असली, तरी शिक्षण हे रोजीरोटीचे साधन असल्यामुळे सर्वच विषय मराठीतून शिकवून चालणार नाही. आयआयटीमध्ये मराठी मुले कमी का असतात याचे उत्तर आपल्याला मातृभाषेसंबंधी आग्रहाच्या मानसिकतेत दिसते. आजचे जग हे ग्लोबल व्हिलेज असताना आपल्या संपर्काची भाषा बदलली असून आपला भूगोलही आता बदलतो आहे. औद्योगिक शहर म्हणून विकसित होणाऱ्या पुण्यात अनेक परराज्यांमधून येणाऱ्या मुलांना त्यांच्या मातृभाषेतून आपण शिकवणार का? ते व्यवहार्य ठरणार नाही, कारण देशात २८ राज्ये आणि सात केंद्रशासित प्रदेश आहेत. त्या प्रत्येकाची भाषा बाहेरच्या राज्यांमध्ये शिकवणे शक्य नाही. याउलट जितक्या जास्त भाषा येतील तितका मुलांच्या व्यक्तिमत्त्वात चांगला बदल घडेल.

ज्ञान प्रबोधिनीमधील मानसशास्त्राच्या अध्यापक डॉ० अनघा लवळेकर यांनी त्यांची काही मानसशास्त्रीय निरीक्षणे नोंदवली. त्यांनी विरुद्ध बाजू मांडताना सांगितले, की मातृभाषेत शिक्षण दिले नाही, तर मुलांपासून पालक तुटले जातात. तसेच इंग्रजीच्या ग्लॅमरपोटी मराठी शाळा ओस पडू लागल्या आहेत. पण विचारकौशल्य हे मातृभाषेतूनच निर्माण होते. भाषा हे मूल्यमापनासाठी नसून आनंद देणारे असल्याने शिक्षणात कोणतेच अडसर राहणार नाहीत. प्रतिभा तसेच नावीन्यपूर्ण कल्पना या आपण ज्या भाषेत विचार करतो त्याच भाषेत सुचतात. कारण त्याच भाषेत आपण अधिक आरामशीर विचार करतो. इंग्रजीत ते सुचणे शक्य नाही. मराठीत सुचलेली कल्पना मात्र इंग्रजीत रूपांतरित करता येते.

डॉ० लवळेकर यांच्या मते, भविष्यात ज्ञानभाषासंपादन हा कौशल्य व सरावाचा भाग आहे. पण त्याआधी मूळ भाषा आत्मसात करून त्याच्याकडे अधिक लक्ष द्यायला हवे. मातृभाषेत भावनिक जवळीक निर्माण होते. मातृभाषेत शिकल्याने भाषेचे मूळ पदर व दिलासा देणारे विनोदाचे सूक्ष्म पदर कळत तो विनोद मनाचे आरोग्य वाढवतो व शिक्षणात हलकेफुलकेपणा आणतो. शिवाजीचा पोवाडा हा मराठीतूनच शिकवला पाहिजे.

त्या म्हणाल्या, की विचारांची बैठक ही आपल्या मातृभाषेतून होत असते. त्याच भाषेतून आपल्याला प्रतीके, विचार, प्रतिशब्द आणि समस्यांची उत्तरे मिळू शकतात. सावरकरांनी अनेक इंग्रजी शब्द मराठीत आणून एक नवा शब्दकोश तयार केला. आज आम्हाला आमच्या भाषेत नवीन शब्द का सुचू नयेत?

परिसंवादातील अनुभवकथनाच्या दुसऱ्या सत्रात भावे प्राथमिक शाळेच्या मुख्याध्यापिका उज्ज्वला गायकवाड म्हणाल्या, की गेली १२० वर्षे मराठी माध्यमातून शिक्षण देत असताना शाळेची प्रगती आजही चढत्या क्रमाने होत आहे. मुलांना मातृभाषेतच भाषेचे आकलन चांगले असते आणि त्याचे उपयोजनही करता येते; पण इंग्रजी ज्ञानभाषा असल्यामुळे इंग्रजी माध्यमात आपल्या मुलांना घालण्याची पालकांची मानसिकता आहे. यातून मुले संभ्रमित होतात आणि इयत्ता दुसरीपर्यंत शिक्षण झाल्यानंतर परत मराठी माध्यमाकडे वळतात. यात त्यांना धड इंग्रजीही येत नाही आणि मराठी शिकण्याची वर्षेही वाया गेलेली असतात. यातून इंग्रजी भाषेबद्दलची भीतीही वाढीस लागते. मराठी माध्यमात शिकलेली मुले पाचवीपासून इंग्रजीत प्रगती करताना दिसतात. तसेच संवादकौशल्यातून त्यांना आपल्या भावना प्रकट करण्यास प्रवृत्त करता येते.

माधव सदाशिव गोळवलकर शाळेच्या मुख्याध्यापिका कल्पना धालेवाडीकर म्हणाल्या, की उगीचच समाजाचे दडपण घेऊन पालक मुलांना इंग्रजी माध्यमात घालण्याचा आग्रह धरतात. यामध्ये विशेषत: महिलांच्या अपेक्षा अतिशय अवास्तव असून आपल्या मुलाने फाडफाड इंग्रजी बोलावे, असे त्यांचे मत त्या निष्पाप मुलांवर लादतात. वास्तविक मातृभाषेतच मुलांचे शिक्षण व्हायला हवे, तसेच आईची मांडी हेच त्याचे पहिले व्यासपीठ असून तिथूनच त्याची भाषा समृद्ध व्हायला लागते. आपल्या भाषेतून अभिव्यक्त होण्यासाठी आम्ही शाळेत मुलांना विविध उपक्रम देतो. त्यात मागच्या पिढीचा इतिहास हा विषय देताना आपल्या आईवडिलांची मागची पिढी व त्यांची नावे आणि माहिती लिहून आणायला सांगतो. यातून वैयक्तिक कुटुंबाच्या इतिहासाची गोडी वाढीस लागते.

शैक्षणिक प्रयोग करणाऱ्या अक्षरनंदन शाळेच्या संस्थापक सदस्य प्रा० वंदना भागवत म्हणाल्या, की मराठी माध्यमाच्या शाळा हाच माझा जैविक पर्याय असून तेच आपले संचित आहे अशी भावना मराठी समाजात निर्माण व्हायला हवी. शालेय जीवनात माझे मराठी-वाचन चांगले असल्यामुळेच इंग्रजी-साहित्याची आवड निर्माण झाली. त्यातूनच मराठीतून इंग्रजी समजावून घेण्याची सवय लागली. अशा प्रकारे मराठी शब्दांना इंग्रजी प्रतिशब्द कोणते याची सवय शालेय जीवनापासूनच लावून घेता येते. मानवी मेंदू अनेक भाषा शिकू शकतो आणि भारतीय माणूस हा बहुभाषिक आहे, हीच अभिमानाची गोष्ट आहे. असे असले तरी आपले पालक इंग्रजीचे दडपण घेताना दिसतात, असे सांगून प्रा० भागवत म्हणाल्या, की शंकराने जसे वेगाने आलेल्या गंगा नदीला आपल्या जटेत सामावून शांत केले आणि पृथ्वीवर आणले तसे इंग्रजीची गंगा मराठीच्या जटेत सामावली तरच तिच्याशी सर्जनशील नाते निर्माण करता येते. आपल्याकडे ही सर्जनशीलताच हरवली आहे. ■

# मराठी भाषेच्या उन्नतीच्या दिशा

– आनन्द काटीकर

१ मे हा मराठी अभ्यास परिषदेचा वर्धापन-दिन दरवर्षी एका अभ्यासपूर्ण व्याख्यानाने साजरा होत असतो. या वर्षी शुक्रवार, दि० १ मे २०१५ला प्रा० डॉ० अविनाश बिनीवाले यांनी 'मराठी भाषेच्या उन्नतीच्या दिशा' या विषयावर आपले विचार मांडले. त्यांच्या मते, मराठी-बोलणाऱ्या दहा कोटी जनतेचा विकास म्हणजे मराठी-भाषेचा विकास होय. ९९%हून अधिक लोकांना इंग्लिश नीट बोलता-लिहिता-वाचता येत नसताना आपण त्यामागे किती धावायचे, हा प्रश्नच आहे. व्याख्यानातले काही प्रमुख मुद्दे पुढीलप्रमाणे :

( १ ) आपण सर्वांनी मिळून मराठी भाषेचा वापर वाढवायला हवा. १९२७पर्यंत एमबीबीएसचे शिक्षण मराठीत उपलब्ध होते आणि आज मात्र तसे उपलब्ध नाही. आजही भारतातील सर्वच वैद्यकीय-महाविद्यालयांत व्याख्याने इंग्लिशमध्ये आणि प्रात्यक्षिक मात्र स्थानिक भाषांत केले जाते. हे लक्षात घेतले तर मातृभाषेतले शिक्षण अधिक उपयुक्त ठरते, हेदेखील आपल्या लक्षात येईल.

( २ ) भारतीय प्रौद्योगिक संस्थेसारख्या सर्वच व्यावसायिक अभ्यासक्रमांसाठी मराठीतून पुस्तके तयार करायला हवीत. हिंदी आणि गुजरातीतून जर हे शिक्षण दिले जाऊ शकते, तर मराठीतून का नाही?

( ३ ) सर्वच मुलांना मराठी माध्यमातून शिकवायला हवे. स्वाक्षरीदेखील सर्वांनी मराठीतच करायला हवी.

( ४ ) सरकारी-नोकऱ्यांत तृतीय आणि चतुर्थ श्रेणीच्या जागा भरताना मराठी माध्यमाचा निकष लावायला हवा, तर प्रथम व द्वितीय श्रेणीच्या जागा भरताना मराठी माध्यमास प्राधान्य द्यायला हवे.

( ५ ) सर्वच आस्थापनांमध्ये मराठीतून पाट्या लावल्या जायला हव्यात. अमराठी भाषकांना मराठी शिकवण्यास पुस्तके व इतर साधने मोठ्या प्रमाणावर तयार करायला हवी.

( ६ ) कोश, भाषांतर इत्यादी अभ्यासपूर्ण प्रकल्पांना प्रोत्साहन द्यायला हवे.

अशा सूचना करताना त्यांनी जपान, कोरिया, इस्राईल, युरोपीय देश इत्यादी देशांची आणि त्यांच्या भाषिक धोरणांची उदाहरणेही दिली. त्यांच्या व्याख्यानानंतर प्रश्नोत्तरे झाली. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रा० आनन्द काटीकर यांनी केले. वक्त्यांचा परिचय सलील वाघ यांनी करून दिला. प्रा० प्र० ना० परांजपे यांनी अध्यक्षीय समारोप केला. ■





अनुक्रमणिका

प्रतिसाद १

# लिपीचे 'सोपेकरण'

– पुष्पा फडके

'भाषा आणि जीवन'च्या दिवाळी २०१४च्या अंकात माझ्या 'मराठीसाठी लोकनागरी' या ग्रंथाबद्दलचा श्री० दिवाकर मोहनी ह्यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यासंबंधी काही खुलासा करत आहे.

( १ ) उच्चाराप्रमाणे लेखन— मी उच्चाराप्रमाणे लेखन असे न म्हणता उच्चारनिकटीचे लेखन अशी संकल्पना मांडली आहे. शिवाय प्रमाण उच्चार म्हणजे शिष्टांचे किंवा कोकणस्थ ब्राह्मणांचे असेही म्हटलेले नाही. त्यासंबंधीचे उल्लेख हे ऐतिहासिक आढावा घेताना आलेले आहेत. माझे प्रतिपादन असे आहे, की पाणी-पानी यांसारखे शब्द एकमेकांचे पर्याय मानून आपण त्यांना स्वीकारावेत. कारण ती दोन वेगळी लेखनरूपे असली तरी अर्थ समजण्यास कोणतीही अडचण येत नाही.

( २ ) संस्कृत भाषा ही मराठीची जननी आहे, असे मी म्हटलेले नाही. ते माझे मत मत नव्हे. याउलट मराठीमध्ये संस्कृतमधील असंख्य तत्सम किंवा तद्भव असले तरी भाषेचा आख्यातप्रत्ययाचा प्राणभूत साचा हा प्राकृत रूपे असलेला आहे असेच माझे विधान आहे. (पान क्र० ९०).

( ३ ) देवनागरी ही अतिशय तर्कशुद्ध लिपी आहे. पण तिच्यात दोन व्यंजने एकाखाली एक (स्वरचिन्ह मिसळून) लिहिली जातात, हे श्री० मोहनींनी केलेले विधान सर्वस्वी खरे नाही. त्यांनी दिलेल्या उदाहरणाप्रमाणे 'विठ्ठल', 'क्रांति' यामध्ये ही रीत दिसते. पण 'सज्जन', 'स्वप्न' यांतील व्यंजनजोडणी एकाखाली एक नसून ती एकापुढे एक अशी आहे, याकडे दुर्लक्ष करता येईल का?

नाट्य, जाड्य याची छपाई करताना एका वेगळ्याच य चे लेखन मुद्रकांनी रूढ केले आहे. (मी त्याला 'पाऊण य' असे म्हणते). माझ्या संगणकावर तसे लिहून दाखवता येत नाही. पण यातील पूर्ण 'य'चे अशा पाऊण 'य'ने लेखन करणे हे व्याकरणाच्या दृष्टीने चूक आहे. देवनागरी लिपी तर्कशुद्ध असली तरी त्यात अशा काही त्रुटी आहेत, हे मान्य करायला नको का? आपद्ग्रस्त (५ प्रकारे लेखन) आणि द्वंद्व (८ प्रकारे लेखन) या शब्दांची तोडाक्षरे म्हणून टिंगल करताना त्यातील अनेक रूपे चुकीची आहेत हे लक्षात घेतले पाहिजे.

( ४ ) मी लिपीच्या सुलभीकरणाचा (माझा शब्द सोपेकरण) आग्रह सोडून द्यावा अशी विनंती मला केली आहे. तोडाक्षरामुळे सामान्य मुले मागे पडतात, हा शोध त्यांनी कसा लावला आहे ते समजत नाही. पण एके ठिकाणी आजच्या लेखननियमाने सर्वांना लिहिता येत नाही, हे त्यांनी मान्य केले आहे व त्यावर उपाय म्हणून खास लेखकवर्ग निर्माण करावा असे सुचवले आहे. म्हणजे लेखननियमांचे सोपेकरण आवश्यक आहे हेच यावरून सिद्ध होत नाही का? मग माझा लेखननियमांचा प्रवास सुबोधतेकडून दुर्बोधतेकडे झाला आहे हा झणझणीत शेरा योग्य ठरेल का?

मी पुस्तकाच्या चौथ्या भागात सध्याचे १८ लेखननियम टाळून ते सोपे म्हणजे केवळ साडेसातच ठेवता येतील अशी मांडणी केली आहे. हा विचार लेखन अनेकांच्या आवाक्यात आणणारा आहे, तो दुर्बोधतेकडे नेणारा नक्कीच नाही.

■

**प्रतिसाद २**

## म्हणी, वाक्प्रचार आणि संप्रदाय

**– प्रा० कल्याण साठे**

भाषा आणि जीवन, 'उन्हाळा' (एप्रिल) २०१४च्या अंकात विद्या प्रभुदेसाई यांचा 'निसर्गानुभवावर आधारलेल्या म्हणी' या शीर्षकाचा लेख आहे. पण या लेखातील सगळ्याच म्हणी नाहीत. त्यात काही वाक्प्रचार किंवा संप्रदायपण आहेत. त्यामुळे शीर्षकात वाक्प्रचार असा शब्द असता तर बरे झाले असते.

या लेखातील एका वाक्प्रचाराचा (डोक्यावर मिरी वाटणे) अर्थ 'अनपेक्षित गोष्ट करून धक्का देणे' असा दिलेला आहे. या वाक्प्रचारात 'मिरी' असे एकवचनी रूप आढळत नाही. त्याऐवजी 'मिऱ्या' किंवा 'मिऱ्ये' असे अनेकवचनी रूप आढळते. या वाक्प्रचाराचा अर्थ 'एखाद्यावर अंमल किंवा वर्चस्व गाजवणे; एखाद्याला दोष देणे, त्याच्यावर ठपका ठेवणे' असा आहे.

कळावे.

■





अनुक्रमणिका

१ सबनीस
२ सरदेसाई
३ सहस्रबुद्धे


**राजर्षि**, मनोहर आणि कल्याण जोशी - पहा : जोशी कल्याण

**लोमटे**, आसाराम - दारे बंद न करणारी भाषा (दखलयोग्य) ३.५९

**शिदोरे**, सुकुमार - 'माणूस : 'मराठी' की 'महाराष्ट्रीय'? २.७२

**शेळके**, केदारी नीलेश-गडहिंग्लज परिसराची भाषिक वैशिष्ट्ये १.२८

**शिंदे**, नवनाथ अंगदा - उस्मानाबाद जिल्ह्यातील सीतारूपधारिणी पार्वतीची आख्यायिका ३.३२

**सरदेसाय**, माधवी - कोंकणीतील महाप्राण आणि 'फ'चे उच्चारण (अनुवादक - विद्या, प्रभुदेसाई) ३.१२
- कोंकणीतील नामवाक्य (अनु० विद्या प्रभुदेसाई) ४.१६

**साने**, राजीव - भावना टांगायला आशयाच्या खुंट्या (दखलयोग्य) ३.५७

**सार्वेकर**, कैलास - (अनु०) : दोन अनुवाद (हिंदी कुँवर नारायण) ३.८
- तीन अनुवाद (कविता) (हिंदी कुँवर नारायण) ४.१०

**सहस्रबुद्धे**, सुप्रिया -''रंगी रंगली मराठी' (ज्याची त्याची प्रचीती) २.६४

**सावंत**, नेहा - ''मारणे' एक अनेकार्थी (न) क्रियापद (ज्याची त्याची प्रचीती) २.६०

**वाघे**, सुरेश - पैसाअडका (प्रतिसाद) ४.७३

**सबनीस**, विवेक - महाँबक भाषाविषयक लेखन - पारितोषिक २०१४ (परिषद वार्ता) ४.७२

**क्षीरसागर**, हेमा - '''मांझी साठी नीरव आक्रोश'' २.४८


## संतसाहित्य आणि आधुनिक-बुद्धिवादी

आपणास आधुनिक बुद्धिवादी मानणाऱ्यांचीही संतसाहित्याच्या संदर्भात कशी दिशाभूल होते हे सांगण्यासाठी मी एक उदाहरण घेणार आहे. प्रभाकर पाध्ये हे महाराष्ट्रातील एक दबदबा असलेले विचारवंत, त्यांचे जागतिक वाङ्मयाचे वाचन थक्क करणारे होते. त्यांना वर्ज्य असे काहीच नव्हते, हे मी पुणे विद्यापीठाला त्यांच्याकडून प्राप्त झालेल्या त्यांच्याच ग्रंथसंग्रहावरून म्हणू शकतो. जगभर फिरलेल्या पाध्यांनी अखेरपर्यंत पुण्याजवळील आळंदी पाहिली नव्हती आणि ज्ञानेश्वरीही वाचली नव्हती! शेवटी शेवटी त्यांना उपरती झाली आणि ते पत्नी कमलाताईंना म्हणाले, ''वाङ्मयावरच मी वाढलो. तोच माझ्या जीवनातील आनंद आहे. तरीही मराठीतला आद्य ग्रंथ मी वाचू शकलो नाही, आणि आता ते मला जमेलसं वाटत नाही. म्हणून कविश्रेष्ठ ज्ञानेश्वरांची समाधी तरी पाहावीशी वाटते.''

- **डॉ० सदानंद मोरे** (घुमान येथील अध्यक्षीय भाषण)

# भाषा आणि जीवन : लेखनसूची : २०१४

**– प्र० ना० परांजपे**

## शीर्षक सूची

[प्रत्येक नोंदीतील पहिला आकडा अंक-क्रमांकाचा आणि पुढील आकडे पृष्ठ-क्रमांक आहेत.
- संपादक ]


अडचण भाषेची - सुधीर रा० देवरे (ज्याची त्याची प्रचीती) १.३१

अल्‌विदा, सत्त्वशीलाताई, अल्‌विदा - यू०म० पठाण (प्रतिसाद) ३.६२

अवकाशवेध - सुशान्त शं० देवळेकर (महाजालावरील मराठी) १.६२

अवघड काम - सुधा गोवारीकर (प्रतिसाद) १.६७

आधुनिक मराठीची अभिजात अवहेलना- प्रकाश परब १.४४

इथे गंजलो मी (कविता) -भालचंद्र नेमाडे ४.४

इंग्रजीच्या विस्तृत प्रभावाच्या कारणांवरून मिळणारे धडे - (अनु०) प्रदीप गोपाळ देशपांडे (इंग्रजी लेख - सुधाकर मराठे) ४.२४

इंग्रजी शब्दाचे 'ग्रामिणायझेशन' - डिंपल दा० मापारी (प्रतिसाद) २.७२

उच्चार आणि उमज - अरुण टिकेकर (दखलयोग्य) ४.६६

उस्मानाबाद जिल्ह्यातील सीतारूपधारिणी पार्वतीची आख्यायिका - नवनाथ अंगदा शिंदे ३.३९

एक दुर्मीळ व्यक्तिमत्त्व :ह०अ० भावे - शरद गोगटे १.३४

'ओ/वो/थंबा' - भालचंद्र नेमाडे - (प्रतिसाद) २.७१

औंध.इन्फो - सुशान्त शं० देवळेकर (महाजालावरील मराठी) २.६९

कोंकणीतील नामवाक्य - (अनु०) विद्या प्रभुदेसाई (कोंकणी लेख - माधवी सरदेसाय) ४.१६

कोंकणीतील महाप्राण आणि 'फ'चे उच्चारण - (अनु०) विद्या प्रभुदेसाई (कोंकणी लेख - माधवी सरदेसाय) ३.१२

गडहिंग्लज् परिसराची भाषिक वैशिष्ट्ये - नीलेश केदारी शेळके १.२८

डेक्कन कॉलेजमधील विविध स्तरांवरील भाषा-शास्त्रासंबंधीचे उपक्रम (२०१३-१४) - ऋता पराडकर, शुभांगी कर्डिले (भाषावार्ता) ४.६८

तुकाराम.कॉम - सुशान्त देवळेकर (आंतरजालावरील मराठी) ३.४९

तीन अनुवाद - (अनु०) कैलास सार्वेकर (हिंदी कवी - कुँवर नारायण) ४.१०

दारे बंद न करणारी भाषा - आसाराम लोमटे (दखलयोग्य) ३.५९

दोन अनुवाद - (अनु०) कैलास सार्वेकर (हिंदी कवी - कुँवर नारायण) ३.८

दोन मातृभाषांचा समाज - संजयकुमार कोळी (ज्याची त्याची प्रचीती) २.६२
'नारायणपेठी' बोली - अंबर ढगे ४.६०
निमित्त : 'फशाळ' - विजय पाध्ये (प्रतिसाद) १.६७
निसर्गानुभवावर आधारलेल्या म्हणी - विद्या प्रभुदेसाई २.५५
प्राचीन ज्ञान आणि आधुनिक तंत्रज्ञान - मनीषा नित्सुरे - जोशी (दखलयोग्य) १.६४
पुन्हा एकदा छंद-विचार - नीलिमा गुंडी (प्रतिसाद) ३-६४
पुन्हा एकदा छंद-विचार -शुभांगी पातुरकर (प्रतिसाद) ३-६५
पुरोपकंठी (ई-शब्दचर्चा) १.५७
पैसाअडका - अरविंद कोल्हटकर ३.३२
पैसाअडका - सुरेश वाघे (प्रतिसाद) ४.७३
फॉण्टची मुक्त दुनिया - नीरज पंडित (दखलयोग्य) ३.६०
बनारसी मराठी बोली - प्रमोद पडवळ ४.५८
बोलसवयी - शरदिनी मोहिते (ज्याची त्याची प्रचीती) ३.५५
बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास - सोनल कुलकर्णी-जोशी ३.२८
भावना टांगायला आशयाच्या खुंट्या - राजीव साने (दखलयोग्य) ३.५७
भाषा-साहित्य-संस्कृती यांचा सखोल अभ्यासक : डॉ० अशोक रा० केळकर - आनन्द काटीकर (संपादकीय) ३.३
'भाषा आणि जीवन' : लेखनसूची २०१३ - विजय पाध्ये २.७५
भाषांतरकारांना आणि साहित्यिकांना उपयुक्त - कल्पना कुलकर्णी (पुस्तक-परीक्षण) ('भाषांतर आणि भाषा' - विलास सारंग) २.६६
भाषाप्रकाश - नीलिमा गुंडी (संपादकीय) १.३
भाषांतर प्रक्रिया : एक भाषाशास्त्रीय विवेचन - अनघा भट
भाषा-वार्ता :
(१) देवनागरीला जगन्मान्यता १.६५
(२) अक्षरयोगिनी टंक १.६५
(३) खांडबहाले.कॉम १.६५
भाषाविषयक लेखनसूची : २०१३ - नीलिमा गुंडी १.६८
मराठी-छंदविचार : परंपरा आणि नवता- शुभांगी पातुरकर २.३३
मराठी-भाषाध्यापनाच्या आधुनिकीकरणाचा प्रकल्प - कलिका मेहता १.३७
मराठी-भाषाविषयक धोरण - प्र० ना० परांजपे (संपादकीय) ४.५
मराठी-भाषाविषयक धोरण २०१४- सुशान्त शं० देवळेकर ४.३३
मराठी-भाषेची अ-श्वेतपत्रिका - प्र० ना० परांजपे (संपादकीय) २.३
मराठीच्या अध्यापनासाठी. आनन्द काटीकर (भाषावार्ता) ३.६१
मराठीत वारंवार येणारे शब्द आणि अक्षरे - कल्याण जोशी आणि मनोहर राजर्षि- २.५

'मराठीसाठी लोकनागरी'च्या निमित्ताने - दिवाकर मोहनी ४.४०
मातीचे गायन - डिंपल मापारी ३.४६
महाबँक भाषाविषयक-लेखन-पारितोषिक २०१४ - विवेक सबनीस (परिषद-वार्ता) ४.७२
'मारणे' एक अनेकार्थी (नव) क्रियापद - नेहा सावंत (ज्याची त्याची प्रचीती) २.६०
'मांझी'साठी नीरव आक्रोश - हेमा क्षीरसागर २.४८
मँडरिन : चीनची राष्ट्रीय भाषा-(अनु०) अ०पां० देशपांडे (इंग्रजी लेख प्रभाकर देवधर) २.५०
मैत्र (आशा मुंडले यांच्याविषयी) - शरदिनी मोहिते १.५४
रंगी रंगली मराठी - सुप्रिया सहस्रबुद्धे (ज्याची त्याची प्रचीती) २.६४
'वर्किंग लंच'-ई-चर्चेविषयी - आनंद जोशी (प्रतिसाद) १.६६
वर्किंग लंच -विद्या प्रभुदेसाई (प्रतिसाद) २.७१
वऱ्हाडी लोकभाषा आणि संस्कृत - प्रतिमा इंगोले ३.२२
व्हॅल्यू-जजमेंट - प्र०ना० परांजपे (प्रतिसाद) १.६६
शिव्यांची शिकवण - (अनु०) अ०रा० यार्दी (कन्नड लेखक -रवीन्द्र भट) ३.५१
संत गाडगेबाबांच्या कीर्तनातील जीवन आणि भाषा —केशव सखाराम देशमुख ४.५५
संत-रचनांतील व्यावसायिक बोली — फुला बागूल ४.४६
संहिता-संपादन : स्वरूप आणि पथ्ये — मृदुला प्रभुराम जोशी २.२५
हैदराबादेतील महाविद्यालयीन शिक्षण व मराठी भाषा — उषा जोशी १.५६

## अन्य :

मुखपृष्ठ चित्रकार - रोहित कोकीळ
अभिनंदन १.३३, २.५९, ४.३
आदरांजली/श्रद्धांजली ५.५६, ३.२, ४.२
देणगी १.२, २.६५, ३.७
पानपूरके १. ५३, ६१
२. ६३, ६८
३. ३१, ४८, ५९, ६१, ६६
४. ३२, ३६, ४५, ५४, ५७, ६५
मुद्रणदोष-दुरुस्ती : १.५३, २.६१, ४.७१
मुखपृष्ठाविषयी : १.७१, ३ मलपृष्ठ, ४.९
लेखक-परिचय : १.७२, २.८०, ३.६७ ४.७४
'विद्वत्प्रमाणित' : ३.१
स्वागत १.६३, २.४७, ३.४५, ४.५९

**लेखक-परिचय**

■ **अर्जुनवाडकर,** मिहिर : भौतिकीमध्ये पीएच०डी०, पुणे विद्यापीठातील मॉडेलिंग आणि सिम्युलेशन केंद्र येथे सहयोगी प्राध्यापक. अनेक संशोधन निबंध (इंग्रजी) नियतकालिकांतून प्रसिद्ध.

टपाल-पत्ता : 1, देवांगिनी, 1192, शुक्रवार पेठ, पुणे 411002.

स्थिरभाष : 020-2447 9419 ई-पत्ता : mihir.arjunwadkar@gmail.com

■ **ओझरकर,** रेणुका : एम०ए०,पीएच०डी० (भाषाविज्ञान), मुंबई-विद्यापीठाच्या भाषा-विज्ञान विभागात साहाय्यक प्राध्यापक.

चलभाष : 98195 98730 ई-पत्ता : renuka_ozarkar@yahoo.com

■ **काटीकर,** जयश्री आनन्द : मराठी भाषा व साहित्य या विषयात एम०ए०, मॅकमिलन इंडियामध्ये तीन वर्षे उपसंपादिका व दोन वर्षे संपादक. सध्या अक्षरनंदन शाळेत सहयोगी अध्यापक.

टपाल-पत्ता : बी-5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411051.

चलभाष : 94227 88085 ई-पत्ता : jayakatikar@gmail.com

■ **टिळक,** विद्यागौरी : 'मराठी भाषा व साहित्य' या विषयात एम०ए०,पीएच०डी०. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रोफेसर. कथा, कविता, लेख, संपादन इ० लेखन.

टपाल-पत्ता : मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411007.

चलभाष : 094230 02950

■ **देवळेकर,** सुशान्त शंकर : एम०ए०(मराठी), राज्य मराठी विकास संस्थेत कनिष्ठ संशोधन साहाय्यक. मराठी 'शब्दबंध' हा शब्द व अर्थ यांचा संबंध दाखविणारा कोश व मराठी शब्दरूपांचे विश्लेषण करणारी 'रूपविश्लेषक' ही संगणकप्रणाली विकसित करण्यात सहभाग. युनिकोड कार्यशाळांत मार्गदर्शन.

टपाल-पत्ता : D / 605, सुबोधनगर, श्रीप्रस्थ चौथा मार्ग, निळेमोरे, नालासोपारा, ता० वसई (जि० ठाणे) 401203.

चलभाष : 097698 35310

■ **फडणीस,** शि०द० : सुप्रसिद्ध व्यंग्यचित्रकार. 'हसरी गॅलरी' इ० पुस्तके. अनेक पारितोषिके.

टपाल-पत्ता : 1233, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र० 4, पुणे 411002.

स्थिरभाष : 020 2447 2232

■ **बडवे,** नीती : 'जर्मन भाषा व साहित्य' या विषयात एम०ए०, पीएच०डी०. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागातून प्रोफेसर म्हणून निवृत्त. विदेशी विद्यार्थ्यांना मराठी शिकवण्याचा अनुभव. 'लर्निंग मराठी ॲज अ फॉरिन लँग्विज' (भाग १ व २)चे लेखन.

चलभाष : 094223 14519

■ **मोडक,** केतकी : 'मराठी भाषा आणि साहित्य' या विषयात एम०ए०.,एम०एड०,-पीएच०डी०,पी०जी०डी०इ०ए०. म०ए० सोसायटीच्या वाणिज्य महाविद्यालयात उपप्राचार्य. 'कडकडोनी वीज निमाली ठायीचे ठायी' या पुस्तकास अनेक पारितोषिके. 'उपयोजित मराठी' या पुस्तकाचे संपादन.
चलभाष : 094210 16089
ई-पत्ता : kmmodak88@gmail.com

■ **मोहनी,** अनुराधा : मराठी-वाङ्मय, लोकप्रशासन व संस्कृत-वाङ्मय या तीन विषयांत एम०ए०. 'कायदा व पत्रकारिता' या विषयातील पदवी. हिंदीची 'राष्ट्रभाषा-पंडित' ही पदवी. भाषा-संचालनालयात - मुख्यत: शब्दकोश व विधि अनुवाद - ह्या शाखांमध्ये २१ वर्षे काम. साहाय्यक भाषा संचालक या पदावरून स्वेच्छानिवृत्त. 'भूमिसंपादन अधिनियम १८९४ - अर्थउकल' हा ग्रंथ प्रकाशित (२०१०) त्याला महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट साहित्य-निर्मिती पुरस्कार.
टपाल-पत्ता : 302, अमृत वर्षा, वझलवार ड्रायव्हिंग स्कूलसमोर, शिवाजीनगर, नागपूर 411051. — 440010
चलभाष : 098814 42448
ई-पत्ता : mohonianu@gmail.com

■ **सबनीस,** विवेक : इंग्रजी आणि मराठी पत्रकारितेच्या क्षेत्रात तीन दशकांहूनही वार्तांकन आणि विविध विषयांवर विपुल लेखन. पुणे विद्यापीठाच्या संज्ञापन आणि वृत्तपत्रविद्या विभागातर्फे पदवी परीक्षेच्या कालावधीत (१९८६-८७) अच्युतराव कोल्हटकर शिष्यवृत्तीचे मानकरी. साहित्य, भाषा, कला, संस्कृती, चित्रपट, नाटक यांबद्दलही वृत्तपत्रे आणि अन्य नियतकालिकांमधून लिखाण.
चलभाष : 093730 85948

■ **सावंत,** नेहा किशोर : भवन्स वरिष्ठ महाविद्यालय, अंधेरी येथे मराठी विभागामध्ये प्राध्यापक. कृष्णाबाई नारायण सुर्वे यांच्या 'मास्तरांची सावली' या आत्मकथनाचे शब्दांकन. हिरा दया पवार यांच्या 'सांगायची गोष्ट म्हणजे' या पुस्तकाचे शब्दांकन. डॉ० प्रकाश खांडके यांच्या 'नोहे एकल्याचा खेळ' या आत्मचरित्राचे शब्दांकन. 'नारायण गंगाराम सुर्वे' या अरुण खोपकर दिग्दर्शित लघुचित्रपटात कृष्णाबाई सुर्वे यांची भूमिका. 'धोबीघाट', 'कच्च्या लिंबू', 'हम, तुम और शबाना' या हिंदी व 'रिटा' या मराठी चित्रपटांत भूमिका. अनेक हिंदी व मराठी चित्रपट, मालिका व जाहिराती यांसाठी डबिंग. अनेक हिंदी मालिकांचा मराठी अनुवाद. नभोवाणीवरील श्रुतिका व कामगार सभा यांमध्ये सहभाग.
टपाल-पत्ता : 603, गोदावरी, रिव्हर पार्क, रावळपाडा, दहिसर (पूर्व), मुंबई 400068.
ई-पत्ता : nehasawant003@yahoo.comin

BOOK PACKET Containing Periodical
ISSN 2231-4059 Marathi Abhyas Parishad Patrika

बुकपोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक
आर०एन०आय० नोंदणी क्र० Q-40048/83

मूल्य ₹४०/-

मराठी अभ्यास परिषद पत्रिका



वर्ष ३३। अंक १। हिवाळा २०१५

प्रेषकः
प्रा० आनंद काटीकर
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद,
बी-5/16, सनसिटी, सिंहगड रस्ता,
आनंदनगर, पुणे 411 051.
Email: marathi.abhyas.parishad@gmail.com







